# आकाश—दिवे




सर परशुरामभाऊ कॉलेजमधील लेखकांचा
प्रातिनिधिक संग्रह.

किंमत १ रुपया.

सारस्वत-सेवा-संघातर्फे प्रसिद्ध होणारें प्रस्तुत पुस्तक म्हणजे ु. प्रो. के. ना. वाटवे व श्री. वि. ग. भिडे यांच्या परिश्रमाचेच मूर्त स्वरूप होय. प्रो. वाटवे यानीं लेखसंग्रहाची कल्पना निघाल्यापासून त्यक्ष पुस्तक निघेपर्यंत प्रत्येक बाबतींत जातीनें लक्ष घातलें व अशा ीतीनें सा. से. संघास उपकृत केलें आहे. गु. प्रो. श्रीपाद महादेव माटे ांनीं प्रकृति ठीक नसतांही उपयुक्त सूचनाद्वारें व लेख देऊन ंघाच्या कार्यास हातभार लावला. प्रो. माटे यांचे संघातर्फे मी न:पूर्वक आभार मानतों.

मंडळाचे सदस्य सुप्रसिद्ध कथालेखक श्री. विष्णु गणेश भिडे ानी अत्यंत उत्साहानें व परिश्रमानें प्रस्तुत प्रकाशनाचे कामीं जें ाहाय्य केले त्याबद्दल मंडळ त्याचे फार आभारी आहे.

सारस्वत सेवा संघाचे श्री. शशाङ्क; श्री. व. ह. कटककर; श्री. े. म. कुलकर्णी ( उमाकुमार ), श्री. पु. रा. भिडे, श्री. वि. त्र्यं. र्दे, श्री. डागे प्रभृति सभासद चांगली वाङ्मयसेवा बजावीत ाहेत, हें नमूद करण्यास अतिशय आनंद वाटतो.

सुप्रसिद्ध लेखक श्री. यशवंत गोपाळ जोशी यांचा, सारस्वत ेवा संघ कायमचा ऋणी राहील. ज. स. लिमिटेडचे व्यवस्थापक ी. यशवंत गणेश वझे व त्यांचे सहकारी श्री. रानडे यांनीं पुस्तक ालडीनें व व्यवस्थित छापून दिलें याचा आभार उल्लेख करणें ावश्य आहे.

| | |
|---|---|
| ा परशुरामभाऊ कॉलेज, पुणें ता. १-३-१९३९ | दत्त पळध, चिटणीस सारस्वत सेवा संघ. |

# अनुक्रमणिका

# कु. सुमति भागवत : : १

पावसाळ्याच्या अगदी सुरवातीचें पहिलें पीक छत्र्यांचेंच. मग त्या रस्त्याच्या कडेकडेनें उगवणाऱ्या समजा किंवा हमरस्त्यामधून जाणाऱ्या येणाऱ्या माणसाच्या डोक्यावर दिसणाऱ्या माना!

पण अलीकडे या पहिल्या पिकाच्या जोडीला दुसरेंहि एक पीक मोठ्या जोमानें फोफावतांना दिसतें आहे. या दुसऱ्या पिकाची गमत अशी आहे:—हल्लीं शाळाकॉलेजांची सुरवातही जून महिन्यात मृगाच्या सधीलाच होते. त्या महिना अखेरपर्यंत या पिकाचा खरा हंगाम असतो. काही निश्चित ध्येयाची किंवा उदरनिर्वाहाच्या साधनाचीही अधुक आशा नसता दुसरा शिकतो म्हणून आपण उगीचच शिकावें अशा वेड्या इच्छेचें बी झाडून साऱ्या विद्यार्थ्यांच्या मनोभूमीत अगोदर कित्येक महिने रुजत पडलेलें असतें. कॉलेजात जाण्यासाठीं आईबापाबरोबर भांडतांना व रुसतांफुगतांना सर्वांच्याच संतापानें आणि डोळ्यांतील पाण्यानें त्यास कोंब फुटतात. प्रेमळ मातापितराच्या खिशाला भोकें पाडून ते बाहेर निघतात.

शिक्षण संस्था व बुकसेलर्स याच्या फळयावर ( Counters ) त्याना पानें फुटतात. त्या पानाच्या जुडग्यांचाच (म्हणजे पुस्तकांचाच ना?) हा हंगाम आम्ही म्हणतो तो !

पानें बाधून विद्यार्थ्यांच्या हातीं दिलीं कीं पिकाची पुढची मळणीमापणी होऊन त्यातला बराच दाणागोटा प्रथम पुस्तकविक्रेत्या शेटजीकडे राहतो. मग फिरते एजट, कमिशननें विकणारे, जाहिरातवाले वगैरे बलुतेदाराची पोटें भागतात. त्यातून उरलेले थोडें भुसकट ग्रंथकाराच्या भुकेलल्या डोळ्याना दिसतें ! तेंसुद्धा प्रत्यक्ष पदरात पाडून घेण्यासाठीं शेटजीकडे घालावे लागणारे हेलपाटे व कराव्या लागणाऱ्या दाताच्या कण्या यांनीं रडकुडीस आलेला ग्रथकार डोळयातील अश्रूनीं त्यातील कुडचाभर दाणे भिजवून त्याची ओलीकोरडी भाकर करून खातो व शिणलेल्या डोक्याला पुन्हा पुढचें काम नेमून देतो.

पण या पिकाच्या इतक्या दूरवरच्या गोष्टी सागून आम्हाला काय करायच्या ? येवढें खरें कीं या पिकाच्या ऐन मोसमांत सुचरितपूरच्या सरस्वतीरोडवरील पुस्तकविक्रीच्या एका मोठ्या दुकानावर–

**कैलास बुकडेपो, बुकसेलर्स ॲन्ड पब्लिशर्स**

अशी एक भली जंगी पाटी जाड सोनेरी अक्षरानीं मजवलेली दिसत होती. दुकानात शाळाकॉलेजासाटीं लागणारीं दरोबस्त सर्व पुस्तकें असून ललित वाङ्मयाचीं गोंडस बुकेंहि दुकानाची शोभा व उपयुक्तता वाढवीत होतीं. त्यात " शिशुकाव्याचें " एक स्वतंत्र कपाट असून त्यावर "**तो धन्य यत्करगता शिशुबुद्धि झाली**" हा रे. टिळकाच्या शिशुकाव्यातील गोड चरण एका पाटीवर तांबड्या रंगांत खोदून काढला होता. आज दुकानांत तुफान गर्दी झाली होती.

असल्या गर्दींत एकदा मोठा माणूसहि घामाघूम व्हावयाचा. मग लहानमहान मुलाची काय गोष्ट ? पण एक चणचणीत दिसणारी छोकरी केव्हांपासून त्या दुकानात वर चढून जाण्याची संधि पहात होती. पुन्हा तिच्याजवळ ना छत्री ना मेणकापड. डोक्यापुरताच

घेतलेला एक फाटका फडका बाहेरच्या झिमझिमीने केव्हांच भिजला होता. म्हणून एकदा दुकानात तरी लवकर जायला मिळाले तर बरें असें तिला वाटत असावे. बराच वेळ तेथें ताटकळल्यानंतर तिच्या नशिबानें एक भले मोठे वाटोळे गृहस्थ पुस्तकाच्या किंमतीबद्दल बरीच हुजत घालून तणतणत खालीं आले. लोकाचें लक्ष त्यांच्या शेलक्या शिव्या ऐकण्याकडे आहे व त्याच्या तावातावानें बोलण्याच्या व अंगविक्षेपाच्या हेलकाव्यानींच बरीच जागा रिकामी होण्यासारखी आहे हे नेमके हेरून ती चाणाक्ष मुलगी चुटूदिशीं वर चढून गेली. चढताना तिच्या फाटक्या व भिजलेल्या परकराची एक धसडी फळीच्या एका खिळ्याला अडकलीच होती म्हणा.

मोठ्या माणसाच्या कमरेहून ती उंच नसावी. शिवाय माणसांच्या माड्याना डोळे कोठे ठेवले आहेत परमेश्वरानें? त्यामुळे तिच्या अस्तित्वाची दादहि तेथील वडीलधाऱ्या म्हणविणाऱ्या मडळींना नसावी असें दिसले. जो तो आपापल्या कामांत होता ना? चेंगरत व श्रीमंताच्या बुटानीं आपले अनवाणी पाय तुडवून घेत घेत ती मुलगी पुस्तकें विकावयाच्या प्रत्यक्ष फळीपर्यंत येऊन पोहोचली एकदाची.

चवड्यावर उभें राहून व मोठ्या प्रयासानें आपले डोळे फळीच्यावर एकदोन इंच आणून मुख्य शेटजीशीं कांहीं बोलण्याचा इरादा दिसला तिचा.

जाणाऱ्या येणाऱ्याच्या हालचालींत यदृच्छेनें एखादी पुरेशी रुंद फट पडलीच तर "कैलास बुकडेपो"च्या मालकाचें ओझरतें दर्शन व्हावयाचें! पण तें सुद्धा किती वेळ म्हणाल तर पढरपूरच्या आषाढीच्या वारींत विठोबाचें होत असेल तितकाच वेळ. पण तेवढ्या वेळातहि पहाणाऱ्याची दृष्टी खेंचून घेण्यासारखी त्याची आकृति होती. खुद्द कैलासाधिपतींच्या चिरंजीवाच्या उदराला साजेल असा त्यांच्या उदराचा विस्तार होता. आणि त्या उदराच्या दिवसेंदिवस वाढणाऱ्या घेरावरून त्याच्या वाढत्या व्यापाराचें अनुमान कोणी केल्यास तेंहि बरोबर ठरण्यासारखे होतें.

त्याच्या तुंदिल तनूवर, झुलीप्रमाणें दिसणाऱ्या त्यानीं अडकून दिलेल्या बिनगुडीच्या सदऱ्यातून त्याच्या मानेभोंवतीं चांगलें पांच महा यज्ञोपवीताचे एक काळेमिचकुट जुडगें दिसत होतें. ते पाहिले कीं, अगदीं साध्यासुध्या गद्य माणसासहि शंकराच्या गळ्याभोंवतीं वेटोळें घालून बसलेल्या कृष्णसर्पाची उपमा सुचे. त्यांच्या टक्कल पडून तुळतुळीत झालेल्या डोक्याच्या अगदीं मागच्या बाजूस पाढऱ्या स्वच्छ केंसाची एक बट विजेच्या पंख्यामुळें भुरभुर उड-ताना क्वचित दिसे. तिच्यावरून गंगेच्या उडत्या धारेची कल्पना मनांत येई. भर दुकानात डोक्यास काहींच न घालतां हे शेटजी बसत असल्यानें भस्ममिश्रित जटा व तेथील अर्धचंद्र या दोन वस्तूंच्या अभावामुळें वरील उपमेच्या पूर्णतेस थोडी उणीव येई. त्याच्याशीं व्यवहार करणाऱ्यांच्या डोक्यास राख व जटा आणि माणुस-कीस अर्धचंद्र त्यानीं कायमचा देऊन टाकला असल्यानें या दोन महत्त्वाच्या वस्तूची तेथें अनुपस्थिति असावी कदाचित्! पण या उणिवेचें उट्टे म्हणूनच कीं काय त्यांनीं आपल्या उपनेत्रयुक्त डोळ्यानीं शंकराच्या तीन नेत्रास एका नेत्रानें मागें टाकलें होतें.

नाकाच्या शेंड्यावर ठेवलेल्या या उपनेत्रातून ते आपली करडी नजर तक्रारखोर गिऱ्हाईकाकडे लावीत. शंकरानें एकाच मदनास जाळल्याची ऐट खुशाल मारावी जन्मभर. पण या कैलासाधिपतीनीं आपल्या चष्म्याखालून लावलेल्या नजरेच्या ज्वालेंत आजपर्यंत किती तरी विद्यार्थ्यांच्या दरिद्री मदनास जाळून खाक केलें होतें.

सदर शेटजी बोलण्यास तोंडापेक्षा नजरेचाच अधिक उपयोग करीत. व क्वचित् त्याचा घुमेपणाही शब्दापेक्षां अधिक बोलका ठरे. शेटजींच्या दोन्ही अंगास त्याचे गण उभे असून ते लोकाच्या ऑर्डरी पुरविण्यांत गर्क झालेले होते. कांहीं गिऱ्हाइकें लांबलांब याद्या पुढें करून घाऊक मागणी करीत, तर काहीं फुटकळ पुस्तकें मागत. बरेचसे ताटकळत उभे राहिलेले लोक लांबून दिसणाऱ्या पुस्तकाची नावें आपल्याशींच पण मोठ्यानें वाचण्यात काळ काढीत होते.

मघाशीं सांगितल्याप्रमाणें मुलीनें आपले तेजस्वी डोळे फळीच्या कडेबरोबर कसेबसे आणून शेटजी आपल्याकडे पहात असावेत या भावनेनें जरा मोठ्या आवाजानें पण स्पष्टपणें म्हटले " अहो, मला 'भागवताचें शिशुकाव्य' हें पुस्तक हवं आहे."

झडत असलेल्या दुकानातील नगाऱ्यापुढें या टिमकीचा आवाज कोणास ऐकू जाणें शक्य तरी होतें काय? पुन्हा पूर्ववत् देवघेव हुजत घालणें, खेकसणें व ते झांकण्यासाठीं खोटें हसणें चालू झालें.

ताणलेल्या तळव्याची कळ थाबेपर्यंत विश्रांती घेऊन मुलगी पुन्हा फळीवरील आपले डोळे पूर्वीपेक्षा थोडे उंच घेऊन म्हणाली, " मला देताना ते पुस्तक भागवतांचे ? २ री 'अ' मध्यें माझा नंबर पहिला आला आहे." हे दुसरें वाक्य उच्चारताना तीव्र बुद्धी दर्शविणारे तिचे डोळे अधिकच चमकले. तिच्या स्वाभिमानी आवाजावरून तिचा भावही असा स्पष्ट दिसला कीं, हें वाक्य उच्चारतांच ते गंभीर शेटजी शाबासकीसह आपल्या हवालीं भागवताच्या 'शिशुकाव्याचा' एक मोठा गठ्ठाच करतील. या अगदीं ठेवणींतल्या अस्त्रानें कोणाचें नुसतें लक्षही आपणाकडे वेधत नाहीं असें पाहून तिची चिवट बालआशा पुन्हा चाचरली. " आमचे दिपोटीसुद्धां म्हणाले कीं, ही मुलगी मोठी हुषार निघेल. त्यांतल्या त्यात तिला कविता चागल्या समजतात व म्हणता येतात. तिला एक भागवताचें पुस्तक घेऊन द्या. म्हणून मी तें मागतें आहे. माझं आडनावसुद्धा भागवतच बरं कां!"

'शिशुकाव्यांच्या कपाटावरील मघाशी सांगितलेल्या चरणावरून तेथें उभे राहिलेल्या एका रसिकाच्या मनात 'लेंकराची जिज्ञासा' या टिळकांच्या काव्यांतील पुढील ओळी येऊन तो त्या जरा मोठ्यांदाच गुणगुणूं लागला:—

रेणूहुनीहि अति सूक्ष्म बियांत राही,
तो थोर पिप्पल तयासम वृक्ष नाहीं,
या अल्प मुग्ध शिशुच्या लघु चेतसांत
नांदे तसाच गुणवृक्ष जया न अंत"

एकाद्या चिंगुरडया पोरीनें निष्कारण केलेली इतकी कटकट शेटजींना खपण्यासारखी नव्हती. त्यानीं आपल्या चष्म्याखालून तिरस्काराची एक प्रखर तिरीप त्या विकसणाऱ्या कळीवर फेंकली. मालकाच्या या महत्त्वाच्या हालचालींचीं साथ करणाऱ्या त्याच्या एका गणानें तिला पर्लीकडे होण्यास हातानें खुणावले. व नुकत्याच आलेल्या एका श्रीमत गिऱ्हाइकास पुढें येण्यास मानेनेंच सांगितले. त्यासरसें शिशुकाव्याचे भोक्ते एक कॉलेजातील गिऱ्हाईक त्या फाटक्या व भिजक्या वस्त्राच्या जिवन्त शिशुकाव्यास दूर सारून पुढें सरसा-वलें. सोन्याचे घडयाळ दिसेल अशा बेताने कोटाची बाही सावरून धरीत शंभराची कोरीकरकरीत नोट पुढें करून तो काव्यभोक्ता साहेबी ठेक्यात म्हणाला " भागवतांच्या शिशुकाव्याच्या पन्नास प्रती ! "

जवळ उभे राहिलेल्या मुलीच्या परकराचा चिखल आपल्या तलम धोतरास लागल्याचा संशय त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता. त्यामुळें तो वरचेवर त्या भिकारडया मुलीकडे तिरस्कारानें व आपल्या घड्याळाकडे व लवकरच होणाऱ्या काव्यगायनाच्या चढा-ओढीच्या कार्यक्रमपत्रिकेकडे उतावीळानें पहात होता. शेवटीं हातात पडलेलीं पुस्तकें व उरलेले पैसे ( दोन्हीही न मोजता ! ) खिशांत कोंबून " **मुलें फुलें ही विकासशाली** " हें पद गुणगुणत तो उमदा कवि मुलीस पर्लीकडे रेटून झपाट्यानें निघून गेला.

" अहो शेटजी, रसग्राही पद्धतीनें ज्यावर उत्तम परीक्षणात्मक निबंध लिहिणाऱ्यास बक्षीस जाहीर झाले आहे तें ( आवंढा गिळून ) कै. भागवताचें 'शिशुकाव्य' पुस्तक तुमच्याकडेच मिळतें ना हो ? " दुकानाच्या पायऱ्या चढून पुन्हा तेथें ताटकळत उभें रहावें लागणार हें टाळण्याचा एका सायकलारूढ कॉलेजकुमारानें थोडासा निर्भीड-पणाचा पण हुकमी मार्ग रस्त्यातूनच पत्करला.

" भागवत कैलासवासी व या बुकडेपोचें नांवही कैलास म्हणून हा प्रश्न विचारतोस होय लेका ? " त्याच्या कलंडल्या सायकलीस आधार देणाऱ्या त्याच्या एका फटकळ सोबत्यानें कोटी केली. शेटजी सहित सगळया दुकानाचे तिकडे लक्ष वेधले या गलबल्यानें शेटजी

चष्म्यांतून आपली नजर त्याजकडे रोखून बक्षिससमारंभांत गलका करणाऱ्या पोरांवर अधिकारयुक्त दृष्टिक्षेप करणाऱ्या वर्गशिक्षकाच्या सफाईनें गुरगुरले, " तुमतें तेथून काय ओरडता? पुस्तकें घ्यायचींत कां?" ('तरच वर या.' असा अभिप्राय सुचविणारा प्रश्नार्थक हिसडा त्यांनीं आपल्या आवाजास दिला.)

या प्रकाराच्या पार्श्वभूमीवर आपला पोक्तपणा व सभ्यता विरोधानें उठावदार दिसेल अशा बेतानें एक थर्ड इयर ट्रेंड शिक्षक पुढें सरसावून साळसूदपणाच्या आवाजांत म्हणाले, " भोजराज पारितोषकाला पात्र झालेले हेंच तें भागवताचें शिशुकाव्य, आपल्याकडे मिळतें ना हो? द्या पाहू मला त्याच्या पचवीस प्रती." प्रती हातात घेत असताना मास्तरसाहेब शिशुकाव्याच्या कपाटावरील पाटीकडे पाहून गुणगुणत होते.

" तो धन्य, तो सुकृति, जो शिकवील याला."

जाताना मुलीला एकीकडे लोटून मास्तर स्वतःच्या धन्यतेचें कौतुक करीत आपला मार्ग सुधारते झाले.

गेलेली जागा कशीबशी परत मिळवून व चवड्याना विश्रांति देऊन कैलासावरील त्या फत्तराला पुन्हा एकदा पाझर फोडून पहाण्याचा प्रयत्न करण्याचें त्या मुलीनें मनात योजिलें—" अहो हें शिशुकाव्याचें पुस्तक नसलें तर बाई मला वर्गात बसू देत नाहींत, मला तें पहायला तरी द्या. तें आईला दाखवून मी परत आणतें. आम्ही तें घरीं ठेवणार नाहीं.' वटारलेल्या डोळ्यांना फारसें न भितां आपलें म्हणणें सरळ एकदा बोलून टाकण्याचा निश्चयच दिसला तिचा. " माझें नाव हवें तर लिहून घ्या. 'कुमारी सुमति भागवत' आम्ही त्या बोळांत......रा० "

तिच्या आडनांवावरून शेटजींच्या सुस्त मेंदूतही कांहीं चेतना झाल्याचा उगीच थोडा भास झाला. त्यानीं अधिक तिरस्कारानें नुसतें " हु:" च केले. त्याची सांथ करीत पुस्तकाचें पुडकें बांधता बांधता

त्यांचा एक गण तिला व बरेंचसें इतरांना उद्देशून हेटाळणीच्या आवाजात म्हणाला " उधार पुस्तक मागते आणि बोलते किती."

मुलीच्या गोड बालआवाजातील कळकळयाइतकें गंभीर मालकाचें " हूः " सुद्धा जमलेल्या गिऱ्हाइकाचे लक्ष वेधून घेण्यास पुरेसें होतें. त्यातले एक वृद्ध पेन्शनर आपल्याच बरोबरच्या दुसऱ्या एका करवतकाठी उपरणें घेतलेल्या गृहस्थास उद्देशून म्हणाले— (त्याना तरी उगाच तोंड मिटून उभे राहण्यापेक्षां बोलण्यास कांहीं तरी विषय हवाच होता.)

'आबासाहेब ही मुलगी कोणाची आलें कां ध्यानांत?' आबासाहेबाच्या डोळ्याच्या अधूपणामुळेच दरमहा ४०० रुपयांच्या फार थोडया पेन्शनवर त्याना लौकर रिटायर व्हावें लागलें होतें. त्यामुळें आपल्या रुप्याच्या मुठीच्या रंगीत काटीवर रेलून ते तिचा चेहरा आपले कवळी लावलेलें तोंड वासून निरखूं लागले. एक म्हातारे भले गृहस्थ आपल्याकडे एवढया आस्थेनें पहात आहेत असें बघून सुमतीच्या बालमनांत आशा डोकावूं लागणें सहाजिक नव्हतें काय?

ती भीत भीत पण लडिवाळपणे त्यास म्हणाली " तुम्ही देतां तें भागवतांचें पुस्तक घेऊन मला आजोबा? मी त्यांतल्या कविता तुम्हाला तुमच्या घरीं येऊन म्हणून दाखवीन." हा प्रश्न ऐकणें 'आजोबास' सोयीचें नव्हतें, किंवा वृद्धापकाळामुळें तो त्यांना ऐकूही गेला नसेल. ते आपल्या वृद्ध मित्रांस काकुळतीनें म्हणाले " किशाकाका नाहीं ध्यानात येत " आठवणीच्या बाबतीतील आबासाहेबाची ती शरणागति ऐकून 'किशाकाकांना' इतिहास संशोधकाचे अवसान चढलें. ते म्हणाले, 'आबा, अहो मी तुमच्यापेक्षां पाचदहा वर्षांनीं वडील आहे, पण स्मरण काय आहे माझें! अहो तो जी. बी. भागवत नव्हता का! आमच्या दिनूबरोबरीचा, तो संस्कृत स्कॉलर हो. त्याला तुमची सुलभी द्यायचीं म्हणत होतों आपण. पण तो पोरगा पडला अभिमानी. त्यानें गरीबाचीच मुलगी केली आणि बिचारा गरीबींतच मेला शेवटीं. कादम्बऱ्या, शिशुकाव्यें सर्व कांहीं छापू लिहीत असे. अतिश्रमामुळे

क्षय होऊन परवां वारला तो." (येथें इकडेतिकडे पाहून जरा सावध गिरीच्या व हलक्या आवाजात किशाकाकाच्या कानाजवळ तोंड नेऊन आबा पुटपुटले ) "याच शेटजीस आपल्या पुस्तकाचे सर्व हक्क त्यानें विकले होते. पण पैसे हातात पडण्यापूर्वीच तो वारला. त्याच्या बायकोनें म्हणतात खटपट केली पैसे मिळण्याची, पण बायको माणसाला कोण विचारतो ? हल्ली ती दादासाहेबाच्याकडे सैंपाकास असते. तिची ही मुलगी. आमच्या नातीकडे मागे खेळायला यायची."

'तुम्हास काय पाहिजे ?' या अर्थाच्या नोकराच्या नेत्रकटाक्षामुळें आबासाहेबांचे पुढचे बोलणें बद पडले. त्यानीं चातुर्मास्यासाठीं ध्रुव व चिलया बाळ याची आख्यानें मागितलीं. किशाकाकाना अस्पृश्याचे मूल कडेवर घेणाऱ्या एकनाथाचे चरित्र पाहिजे होतें. पुस्तक घेत व पैसे देत आबा किशाकाकास महज म्हणाले, 'हे तुम्हांस जर माहीत आहे तर तुम्ही शेटजीकडून काहीं पैसे हिच्या आईस कां देववत नाहीं ?" हा प्रश्न ऐकून किशाकाकांस मोठें आश्चर्य वाटलेसें दिसले. ते म्हणाले, 'अहो, आपल्याला काय करायच्या ह्या पंचाइती ! आपलें 'हरि' 'हरि' म्हणत आम्ही आता स्वस्थ असावें. त्यातून सर्वसाक्षी भगवानानें तिला उत्पन्न केली आहे तो काय तिची सोय नाहीं लावणार ?' सदर भारतीय तत्त्वज्ञानानें तर आबाचे पूर्ण समाधान झाल्यासारखें दिसलें. ते दोघेहि आजोबा तोंडांतील कवळ्या न पडतील अशा बेतानें हंसले व त्यांच्या त्या 'नातीच्या' हिरमुसल्या तोंडाकडे न पहातां शरीराचा तोल न जाईल अशा बेतानें पायऱ्या उतरून मार्गस्थ झाले.

सदर कुजबुजीची कुणकुण शेटजींच्या केसाळ कानापर्यंत तेव्हांच गेली. त्याचप्रमाणें सदर प्रकरणाची माहिती किशाकाकास आहे हें लक्षांत येऊन ते सुमतीच्या अंगावर वस्कन खेंकसले 'चल चालती हो, दाखवायला फुकट पुस्तके तुझ्या बापाने ठेवली आहेत इथे.' काळ्या ढगाच्या गरजण्याने भेदरलेल्या पाडसाप्रमाणें तिनें आपला मोर्चा रस्त्याकडे वळविला असेल नसेल तोंच तिकडूनहि वीज कडाडली, 'कार्टे किती धुंड तुला ! याच दुकानांत कशाला मरायला

आलीस? म्हणे वर्गात पहिली आले! नशिबाची पडलीस की नाहीं! शेण लावायला शिका आतां ... '

आपल्या रट्टयाला धरून आपल्यास फरपटत नेतांना आई आणखी काय काय बोलली ते सुमतीला सर्व नीट समजलें नाहीं. पण वर्गात पहिला नंबर येणें चुकीचे आहे, व पुस्तकें वाचणें हा गुन्हा आहे असें मात्र तिला खास वाटलें. तरी भागवताच्या शिशु-काव्याचें नवें पुस्तक घेऊन त्यातली चित्रे पाहात रस्त्यानें जाणाऱ्या आपल्या वर्गातील मुलीकडे ती आईचा डोळा चुकवून पाहातच होती.

—प्रो. के. ना. वाटवे, एम्. ए.

( केसरी २७ आक्टोबर १९३३. थोडा फेरफार करून. )

---

# दावेदारिण ! : : २

पहाटेचा सुमार.

आडरानांतील रस्त्याने दोन बैल गाड्या चालल्या होत्या.

मोठ्या सडकेच्या कडेला खूपशीं लहानसहान गावें असतात अन् त्याना जाणारे अवघड सोपे मार्ग ठायीं ठायीं फुटतात.

तसाच तो एक रस्ता होता.

पुढची बैलगाडी—

तींत मालक गाढ झोंपला होता. बैल धीरे धीरे चालले होते.

त्याना खायला भरपूर मिळालें नसावें बहुधा; कारण, रस्त्याच्या लगतच्या वावरामध्यें जी कडब्याची गजी होती तिकडे ते वळले.

खडकाळ खडकाळ होते जिकडे तिकडे. डोंगरातला रस्ता होता तो. बाजूला एक भयंकर कडा होता. बैलगाडीचें चाक जर कां खालीं निसटले, कीं आटोपलाच कारभार.

—एवढयांत मागील गाडींतून कुणी कानठळया बसेपर्यंत ओरडले. 'गाडी आवरा हो पाव्हणें...खाली कोमळेल...'

शक्य तेवढया मोठयाने ठोकलेल्या ह्या आरोळींत एक तऱ्हेची जनानी नाजुक झांक होती!

आवाज कानीं पडतांच देवनाथाला चटकन जाग आली.

त्यानें बैल खेचून धरलें व गाडी पूर्ववत् मार्गाला लावली.

मघाची मागली बैलगाडी आता पुढच्या बाजूला वाटचाल करीत होती.

'बाई, तुमचे उपकार आहेत माझ्यावर.'

'उपकार कसले. बाबा आडवा झाला मला उठवून. माझं ध्यान गेलं. गाडी कडयापारहि पडली असती. तळाला काटयाकुटयांनीं भरलेलीं बाभळीचीं झाडें दाट दिसताहेत.'

'म्हणूनच मरण चुकत नव्हतं माझं. कुठून आली तुमची गाडी?'

'ह्याच मुलखांतून. बाबा वर्षांतले तीनचार महिने गाडी जुंपतो. शेतांतल धान्यधुन्य गुळाच्या ढेपा, भवानीपेठेंत न्यायच्या असतात.'

'माझी कोळशाची गाडी आहे. कधीं लांकूडफाटा, कधीं कोळसा घेऊन ती बारमहा पुण्याकडे जातें.'

'काय बडबडतीस ग सारजा!' त्या मुलीच्या बापाची झोंप त्यांच्या बोलण्यानें चाळवली. तो आळोखेपिळोखे देऊं लागला.

'बाबा बाबा, उठ, इतक्यामधें मागले गाडीवान आहेत ना ते...ते...!'

देवनाथाचें सारजेच्या म्हणण्याकडे लक्ष होतें. सारजा अडखळलेली पाहून तो हसत बोलला, 'अहो, मी आटपत होतों. गाडी कडयाखालीं आदळत होती; तुमच्या बाळीनं माझे प्राण वाचवले.'

'औं!' म्हाताऱ्या होनाप्पाचे झोपेंत चिकटलेले डोळे तटकन उघडले. तो उठून बसला.

झुंजूमुंजू व्हायच्या वेळेला देवनाथ होनाप्पाला उद्देशून म्हणाला ' चला राव, गाडी थाबूं द्या थोडा वेळ. थंडीचें दिवस हे. अंग गारठ्यानं काकडतंय्. शेक घ्यायला या. '

बैलगाडींतलं गवाळ एकीकडे नेऊन देवनाथानं आगटी चेतवली.

नंतरच्या संभाषणात देवनाथाला खात्रीलायक कळलें कीं सारजा व होनाप्पा राहतात तें गाव आपल्या ठिकाणापासून अवघें चारपांच कोसांच्या मजलेवर आहे.

होनाप्पाला, खिशामधलें सामान चांचपता चांचपतां सरतेशेवटीं हवी ती वस्तु सापडली.

मोठ्या कष्टानें मिळालेल्या तीन विड्यांतील एक देवनाथासमोर धरीत होनाप्पानें विचारलें ' तुम्ही फुकतां ? '

' छः '

' नवल विपरीत आहे ! तुमच्या गांवाला ताडीगुत्ता आहे अन् तुम्ही साधी फर्मास विडी दिसॅल...'

' नाहीं नाहीं. मला दारू पाजण्याची माझ्या लहानू नांवाच्या जिगर दोस्तान खटपट केली. त्याच माझ याचमुळें बिनसल.'

' गाडी तुम्ही कुठल्या अड्ड्याला सोडतां ? ' सारजेनें प्रश्न केला.

' अमुकच ठिकाणीं अस नाही. पण फार करून मगळवार पेठेंतल्या गाडी तळावर. '

' माझा भवानीपेठेत उद्योग असतो, तिथंच वल्लभाकडे उतरतों.' होनाप्पा म्हणाला.

' ह्याना नेहमीच बरोबर घेतां ! '

' सारजेला !...हॅः कित्ती काळानं परवा आमच्या गावीं दुकानचे मालक वल्लभ आले. घरोबा जमला. बऱ्याचदा ते बोलले, घेऊन ये सारजेला, नेतोय आज.'

' देवान खैर केली; मी मेलों असतों आज.' देवनाथ सारजेकडे कृतज्ञ भावानें पाहत म्हणाला.

' तुमचं आपलं कांहीं तरीच ! ' अशा अर्थाचे शब्द सारजा अस्फुट स्वरांत बोलली.

आतां लख्ख उजाडले होते. शहरांत जाण्याची तसदी अशी कोणाला नव्हती. तसें पाहिलें तर देवनाथालाच जराशी घाई होती. तरीही गप्पाचा बिलकुल कटाळा न आल्यानें देवनाथाने आपल्या गाडींतील पोत्यामधले काहीं कोळसे काढून विस्तव शिलगावला.

'इतकी तकलीफ कशाला घेता ? हवीच असली तर आमच्या बैलांची वैरण आणते. कोळसे हे तुमच्या धंद्याचे सामान ...' सारजा देवनाथाला हटकवून स्वतः वैरण आणण्यास निघाली सुद्धां होती.

पण—

'आजच ओळख झाली. बपू थोडा वेळ गोष्टी बोलत—माझ्यापाशीं लांकडं असतीं तर तिखट धुराच्या भीतीन मी वैरणच जाळली असती. तशातला प्रकार नाहीं. कोळशाचा विस्तव टिकेल ...' असें अर्धवट सारजेला व अर्धवट होनाप्पाला म्हणत देवनाथानें कोळसे आणले.

आणि यानंतरच्या हास्यविनोदांत देवनाथाला सारजाबद्दल आणखी माहिती कळलीं.

सारजाच्या थोरल्या बहिणीचे लग्न नुकतेंच झालें होते. तीही सारजेप्रमाणें स्वरूपानें देखणी होती. साहजिकच तिच्या विवाहानें होनाप्पाचें एकोणीसशें रुपयापैकीं हजारभर रुपये कर्ज फिटलें. शेतीचा धंदा आंतबट्टयातला असल्यानें होनाप्पाला व्यवहारी हिशेब केल्याखेरीज इलाज नव्हता. अर्थातच सारजेच्या लग्नानें आपला कर्जाचा भार जितका फुलफुलीत होईल तितका तो करणार होता. हुंडा म्हणून कमीत कमी रोख आठशें रुपये घेण्याचा त्याचा निर्धार ठरला होता.

देवनाथ स्वतः लग्नाला उतावळा नव्हता. सारजेसारखीची तर अपेक्षा धरण्याचा आपल्याला अधिकार नाही असे त्याने तेव्हाच जाणलें !

सारजा मात्र देवनाथाचें मन रिझेल असें पुष्कळ बोलली. देव नाथाच्या गाडीला जुंपलेल्या विशेषतः एका बैलासारखे जनावर

आपण अद्याप पाहिलें नसल्याची सारजेनें जी ग्वाही दिली ती देवनाथाला अतिशयोक्तीची वाटली.

परंतु हा आपला गैरसमज असल्याचें त्याला लवकरच उमगलें.

कारण मध्यतरीं देवनाथाची व होनाप्पाची बैलगाडीतच जातां येतां भेट झाली असता होनाप्पा देवनाथाला म्हणाला, 'देवनाथ, तुमचा बैल कसला तगडा आहे हो!'

'हाच बैल मला माग एका खेपेला मारणारा होता; पण तुमच्या सारजेनं...'

'हा: हा:! देवनाथ, सारजा तुमची आताशा आठवण काढते सारखी!'

'खरच!'

'हो; तुम्हाला घेऊन या असं मला कितीकदां बजावलं तिनं! गांठच पडली नाहीं आपली. बर झालं दिसलात, तुमच्या गावींच येणार होतों नाही तर आमंत्रण द्यायला. येताना तुमचा हा बैल घेऊन या. आमची गाय फळायचीय्. अनायस माझही काम होईल.'

'थट्टा करतां कीं काय! तुमच्या गांवांत जनावर नाहीं असं?'

'कुठल! सरकारचे अर्धे पैसेन् गावकऱ्याचे अर्धे या अटीवर एण वळू मिळाला असता. पण गुण्यागोविंदान निमूट राहिल्यावर आमचीं भाडणं कोण भाडेल? गावात फूट, कटकटी, मारामाऱ्या; वल्लभ हाते तिथपर्यंत....'

'कोण वल्लभ?"

'भवानीपेठेतले व्यापारी. मी आपल्या शेतीचा माल ज्याच्याकडे नेतों ते. तुमच्याहून आठ–दहा वर्षांनी वडील असतील. पहिली बायको गमावली त्यांची. त्यामुळ पग्वा ते जिवाला विरंगुळा येण्यासाठीं आपल्या गावीं कित्ती वर्षांनीं म्हटल्यासारखे आले. वल्लभांचा गांवात भारी वचक; असा श्रीमत इसम व्यापारानिमित्त पुण्याला राहिला. भिकारड्या खेड्यात दुफळी माजली. मग याल का बैल घेऊन हा?'

'हो हो.'

—अन् देवनाथ गेला तेव्हां सरजा त्याला दुसऱ्यांदा भेटली. तिच्या आगतस्वागताच्या पद्धतीनें देवनाथाच्या मनातील निजलेल्या भावना जागृत झाल्या.

* * * * *

आठवड्याच्या आतच मंगळवार पेठेंतल्या गाडीतळावर भर दुपारी बारा वाजतां देवनाथाची चौकशी करीत होनप्पा बैलगाडीतून आला.

'सारजेनं बोलावलंय् तुम्हांला देवनाथ; भवानीपेठेंत चला; वल्लभाकडे उतरलीय् ती! सारजाच येणार होती उन्हातान्हाची; मी म्हटलं; मी बोलावतो तुम्हाला! वल्लभाना हें समजलं तशी त्यांनींही माझ्या मताला जोड दिली.'

गप्पा-वेल्हाळ होनाप्पानें आपल्या येण्याचा खुलासाच इतका स्पष्ट केला होता की, त्या बाबतींत अक्षरानेंही अधिक न बोलतां इकडच्या तिकडच्या बाता मारीत देवनाथानें बैलगाडी हाकारली.

'का बोलावलंत?' सारजा भेटली तेव्हां देवनाथानें विचारलें.

'तुमच्याबद्दल काहीं वाटतं म्हणून! ही घ्या शिताफळं.' ओच्यातलीं पिकलेलीं सिताफळे देवनाथाला देत सारजा म्हणाली.

'शाबास! आमचाही म्हटलं मालकीचा मळा आहे. अन् त्यांत शिताफळ होतात. कमाल आहे तुझी, नव्हे!' खेळीमेळीनें बोलतांना आपण एकेरी उच्चार केला हे बरं झालं नाहीं असें देवनाथाला वाटलं. तो आपल्या चुकीची दुरुस्तीही करणार होता.

पण तसें होण्यापूर्वीच सारजेनें त्याजकडे नजर रोखीत म्हटलें, 'देवनाथ!'

इतक्यात वल्लभ आल्यानें देवनाथाला तेथून हलावें लागलें. वल्लभनें देवनाथाविषयीं तुसडी वृत्ति उगाचच दाखवली.

उलटपक्षी देवनाथाचेंही वल्लभाच्या रोगिष्ट काटकिळ्या मूर्तीबद्दल अनुकूल मत झालें नाहीं.

दुकानांत असलेल्या होनाप्पाचा निरोप घेऊन देवनाथ निघाला.

मात्र जाताना सारजेच्या कटाक्षाचा इषारा ओळखून देवनाथानें आपलें हृदय तिच्या स्वाधीन राहू दिलें.

देवनाथ सारजेचा अलीकडे जास्त ध्यास घेऊं लागला.

सारजा मिळण्यासाठीं त्यानें आपल्या इतर भावांशीं फारकत केली; शेतीचा वेगळा विभाग काढला व तो अकराशें रुपयाना विकला.

सुखासुखी होणाऱ्या या भानगडी नव्हत्या; कित्येक महिने सहज निघून गेले.

पैसे हातांत येईपर्यंत देवनाथानें सारजेची पूसतपास घेतली नाहीं; पण रक्कम मिळाल्यानंतर त्याला दम काढवेना.

वेळ–अवेळ न पाहतां देवनाथानें सारजेच्या गावाकडे बैलगाडी पिटाळली. रात्रीं तीनला त्यानें होनाप्पाला उठवलें.

'स्वस्थपणान बोलणीं करूया' अशी सुरवात देवनाथानें केल्या मुळे होनाप्पानें मोकळ्या जागीं शेकोटी शिलगावली. घोगडी पांघरून तो बसला.

'सारजेची कशी काय तब्येत आहे?' देवनाथानें सवाल टाकला

'आजारी आहे बिचारी! नवरा सदा दुखण्यांत असतोच. कुढते आहे वाटतं.'

'म्हणजे! सारजेचं लग्न झालं का काय!'

'वल्लभाना दिलीय् तिला.'

'मला नाही बोलावलं लाडू खायला!'

'वल्लभानीं बजावल होतं तसं!'

'छान, छान! म्हातारबुवा, सुंदर केलंत! जांवई पण जांवई हेरला होनाप्पानीं!'

चमत्कारिक हंसत मुंडाशातील नोटांची परचुंडी देवनाथानें बाहेर काढली व पन्नास–पन्नासाची एक अशा बावीस नोटा त्यानें शेकोटी मध्यें टाकल्या!

' अहो, तुम्हाला वेड तर लागलं नाहीं !' होनाप्पा त्याला सारखें म्हणत होता.

' हें पहा, मला अडथळा कराल तर जीव देईन ! माझा बैल तुम्हाला आवडला होता ना ! तो तुम्हाला घ्या हवा-तर,-जा-जा त्यात तुमचा फायदा आहे. '

* * * *

दोन दारूडे पुण्याच्या रस्त्यानें चालले होते.

' लहानू तूं किती पिशील ?' दुसऱ्याने पहिल्याला विचारिलें.

' मी दोन बाटल्या पिईन ' लहानू म्हणाला.

' मी तीन बाटल्या घेईन ' दुसरा बोलला.

' मी चार बाटल्या झोकीन ' लहानूनें माघार न घेण्याचें ठरवलें.

' मी खडल्यावासल्याचं धरण पिईन ' दुसरा दारुड्या देवनाथ यानें उत्तर दिलें.

आणि मनसोक्त ताडी ठांसून गटारामध्यें झोकांड्या खात देवनाथ पडला असतां खूप इजा झाल्याकारणानें त्याला ससून हॉस्पिटलमध्यें पोंचविण्यांत आलें.

त्यानें इतकी ताडी घेतली होती कीं, दोन दिवस तो मेल्या सारखा पडला होता !

तिसऱ्या दिवशीं सायंकाळीं चार ते सहाच्या दरम्यान त्या प्रशस्त खोलींतील सगळे रोगी पाय मोकळा करण्यासाटी व्हरांड्यांत हिंडत होते. देवनाथ तेवढा आढ्याकडे पाहत निजला होता.

प्रत्येक खाटेवर नजर फिरवीत एक मराठ्याची मुलगी चालली होती.

' कोण ! तुम्ही !!' तिनें देवनाथाच्या खाटेपाशीं थबकून आश्चर्यानें म्हटलें.

देवनाथानें पाहण्यांत बदल केला नाहीं. कांहीही हालचाल केली नाहीं.

' अहो ' तिने देवनाथाचें डोके आपल्याकडे वळवीत म्हटलें.

' कोण तूं ...कोण तूं ' भेसूर आवाज आला.

‘ मी सारजा—’

‘ सारजा...हा: हा: !–कशाला आलीस इथं ! ’

‘ तिकडे आजारी पडायचं झालं, खाटेचा नंबरही ठाऊक नाहीं. इंग्रजी आंकडे उमजत नाहींत. चाललेय् शोधत. किती खराब दिसतां तुम्ही ! कोण ही दशा ! ’

‘ दशा ! सारजे इथल्या इस्पितळांत मढं होईल माझं ! ’

‘ काय हें बोलणं ! ’

‘ मी जगावं अशी इच्छा आहे तुझी ! ’ देवनाथानें तिचा हात पकडून विचारलें.

‘ हा हां असला फाजिलपणा खपायचा नाहीं हं मला. मी ओरडेन. तुमच्या हाताला ताप लागतोय्. औषधपाणी नीट आहे ना इथं ? तुम्ही हल्लीं वेडेवेडे चार आरंभलेत असं बाबा म्हणत होता. ’

‘ सारजे, त्या नर्सा न् डाक्टर न् त्याना म्हणाव इथं ताडी ठेवा! ......एक बाटली रिकामी झाली कीं दुसरी ओतत जा माझ्या घशात ! ”

‘ बाई बाई ! विडीचं सुद्धा व्यसन नव्हतं ! बाबान सागितलें तेव्हापासून आपल्याला सांगेन म्हणतें आहें. शेकडों रुपयांच्या नोटा जाळून काय मिळवलत ? वेडयासाररवं वागू नये माणसानं ! सोडून द्या बघूं हें खुळेपण—! ’

‘ हेंच—हेच ते विश्वासघातकी डोळे ! यानींच मला सपशेल फसवलं ’ तिचा हात देवनाथानें सोडून दिला.

सारजेचे नेत्र पाण्याने डबडबले—‘ पण—पण माझा नाइलाज झाला. बाबाचं सारं कर्ज फेडण्याकडे लक्ष ! मीं मोडता घालायची शिकस्त केली. अखेर म्हटलं, अफू खावी. ती सुद्धां कुठं मिळते; जीव जाण्याइतकी मिळेल कीं नाहीं हें ठाऊक नव्हतं हो. ’

‘ मूर्ख मुली, चालायला लाग ! मला रोज संध्याकाळी देत जा ताडीची बाटली आणून. नकोच; सारजे जा तूं कशी. ’

‘ दारू सोडा आधीं माझ्याकरतां. ’

‘ तुझ्याकरतां ! तुझा–माझा काय संबंध ? ’

' मी कुणीच नाहीं ना तुमची ? ' अजून सारजेचे रडे ओसरलें नव्हतें.

' आहेस; दावेदारीण आहेस ! मागंच बैलगाडी कोसळत होती कडयाखाली तेव्हा मला का नाहीं सुखान मरू दिलेस ? '

' देवनाथ, काळजाला घरे पडतात, नका हो टोचू असे. ' दुःखभाराने विसाव्यासाठी देवनाथाच्या छातीवर सारजेने डोकें टेकलें मात्र !

' लाबून-दुरून-पतिव्रते स्त्रिये;होनाऱ्यानं दिलेल्या नवऱ्याच्या छातींत तें डोकं खुपस अन् मनमुराद रड ! ' देवनाथ खाटेच्या पलीकडच्या बाजूला उभा राहून खिडकीबाहेर पाहात म्हणाला.

इतक्यांत एकजण रोगी आत आला.

' यांना सांभाळा बरं कां ! डोकं थाऱ्यावर नाहीं याचं ' असें त्याला बजावून सारजा गेली.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं ती पावणे चारलाच आली. तेव्हा तिला समजले कीं—

' रोगी कॉटवरून पहाटेचा पळाला ! '

आणि ही बातमी ज्या पेशटानें तिला सांगितली, तोच आणखी पुढें म्हणाला.

' ही कॉट वाईट आहे, मी आज वर्षभर बघतो आहें. या कॉट-वरचा एकही रोगी जिवत राहिला असं झालंच नाही. '

रखरखीत उन्हातून घराकडे जाता जाता सारजा मनाशीं कितीदा तरी म्हणाली.

' देवनाथाची ही दावेदारीण लौकरच अंथरुणाला खिळेल, इस्पि-तळांत जाईल न् तीच खाट मागून घेईल. '

—विष्णु गणेश भिडे

[ विविध वृत्त १८ डिसेंबर १९३८ ]

## परोपदेशे....! : ३

"संतांनीच म्हटलं आहे ना?........परोपकाराय........ म्हणून तर आमच्या सारखे जगलेत!—बाकी तो मनुष्य और हं.......पांच रुपये त्याला उसने देवेनात........ किती तो गृहस्थ पाया पडुन मागत होता........पण याला कांहीं पाझर नाही........अन् मागनं तो गृहस्थ गेल्यावर मला म्हणाला काय, म्हणे त्याच्या कडनं आधीचे दोनशें यायचेत्!.... ....म्हटलं आणखीन् पांच वाढले असते, बिघडलं कुठं?........ बरं तें जाऊं द्या—पण एक दिवस त्याची नवी सायकल मागितली....म्हटलं पाहूं तरी कशी काय आहे ती........तर चक्क सांगितलन् कीं पंक्चर आहे म्हणून........तसाच तो रामभाऊ— एकदां पोरगं फार रडत होत म्हणून ग्रामोफोन मागायला गेलों

तर म्हणे पिन्स संपल्यायत्....मी म्हटलं तुझ्यापेक्षां सवाई फोनो आणीन....अं ? काय म्हणतां ?........हं हं........नाहीं आणला नाहीं अजून—विलायतेहूनच एकदम मागवायचा विचार आहे ....नाहींतर आतां रेडिओच जास्त प्रचारांत आलेत....... ग्रामोफोन आऊट ऑफ फॅशन झाले--तेव्हां एखादं रेडिओचंच मॉडेल घेईन........कुणाला अशा गोष्टी सांगितल्या तर लोक मलाच निंदक म्हणतील ?......पण तुकोबा महाराजानींच म्हटलं आहे ना 'निंदकाचें घर......' ह्यः ह्यः....... त्याला देखील अस्सा शेजाऱ्याकडून त्रास झाला बरं !...अन् म्हणूनच ती ओळ लिहिली—सिनेमांत दाखवतातच कीं ते सगळं !—फार कशाला पण आमच्या त्या सातपुत्याला त्या मद्राश्यानं प्रमोशन दिलं अन् आम्ही बसलों वाजवीत !...... आणि उत्तर काय म्हणे Your work is not satisfactory-- काय कळतंय् हो त्याला ?......कोण आलंय रे गोपू बाहेर ?... ...गोविंदा कां ? अरे त्याला सांग मग दोन तीन दिवसांनीं यायला...अरे आम्ही पळून कां जातोय ?......म्हणे दोन महिन्यांचा पगार राहिला......अन् ही सकाळची वेळ कां रे पैसे मागायला यायची ?......काय ?...हो हो म्हणे मी सांगितलेल्या वेळीं आलोय......मोठा करेक्ट मला ठाऊक आहे ! नोकरीवर कधीं वेळेला यायचा नाहीं पण पैसे सांगितल्या वेळेला मागायला तयार ?......उद्यां ये जा !......पाहिलंत ......अहो त्याचं कसलं खरं मानतां—आमच्या घरी नोकरीला होता हा......अन् एक दिवस दोन महिन्याचा पगार थकला

म्हणून चक्क निघून गेला……एक महिन्याची नोटीस तरी द्यायला नको कां ?……पहा आतां तुम्हीच—नोकऱ्या तरी आहेत कुठं ?…पण बोलून चालून मोलाची माणसं हीं……कोण आहे ?……या……Excuse हं……स्पष्ट सांगायचं जिवावर येतं पण तुमच्या संस्थेला मला मदत देतां यायची नाहीं…… काय म्हणतां लोकाश्रयावर चाललीय् तुमची संस्था ?…… अहो मग गांवातले इतर लोक कांहीं मेले नाहींत !—च् च् च् काय अवस्था आहे या संस्थांची ?—एक पै देखील लोक मदत करीत नाहींत……तरी मी प्रत्येक व्याख्यानांत सांगतो बाबांनो दुसऱ्याच्या उपयोगी पडा ! ”

—वसंत हरि कटककर, पुणें.

[ ज्योत्स्ना—नोव्हेंबर १९३८ ]

## निःश्वास ! : ४

[ जाति : चन्द्रकान्त ]

[ १ ]

कण्टक-राशी असोत किंवा सडेच सुमनांचे
मार्गीं माझ्या; मुळीं न मजला शुभाशुभहि त्याचें
असो रात्र अन्धारी किंवा फुलली ज्योत्स्नेनें
सुकलेली मम हृदय-कुमुदिनी अतां न ती फुलणें !
येऊं दे उधळीत गुलालहि उषेस पूर्वेंत
किंवा फान्दीवरी विहङ्गा बैसूं दे गात
कीं सूर्याला धरेंत अपुला प्रकाश पसरूं दे
पुष्पांच्या कीं भरो दश-दिशा सन्तत सौगन्धें

पर्जन्याच्या किंवा आल्या सरींवरून सरी
आणि इन्द्र-धनु ऊन-पाउसें झाले प्रकट जरी
कीं अस्ताला जाउनि दिन-मणि झाली ती सांज
आणि यामिनी चढवुनि आली तारांचा साज !
मला न ह्यामधिं विरङ्गुळा लाभेल कधीं कां कीं
प्रणय-भग्न मी हिण्डे वणवण कुठेंहि एकाकी !

[ २ ]

आजवरी मी चालुनि आलों कितीतरी प्रान्त
परि हृदयींची माझ्या अजुनी सरे न ती भ्रान्त !
तिचा गांव सोडून दूरवर आलों देहानें
हृदय परी तिजभंवतीं घुटमळे अजून आशेनें !
पुरे पुरे रे वेड्या हृदया ! ती आशा सोड
प्रीतीची बिस-तंतु-बन्धनें नाजुक तीं तोड !
काय परी मिळणार तोडुनी त्या बिस-तन्तूना ?
गान सम्पलें तरी तरळती कानामधिं ताना !
हाय स्मृती तीं सन्तत जाळी मनास ह्या माझ्या
जरा सौख्य देऊन भुलविती जैशा फुलबाज्या !
कितीक केले उपाय मधली शमवाया आग
फुलारलेली उजाड होई आंतलीच बाग !
रान-फुलांचा गंध न मजला मुळीं देत शांति
चन्द्राचे कर शीत आंतला दाहच वाढविती !

[ ३ ]

तिला निसर्गें दिधलें आनन प्रफुल्ल चन्द्राचें
आणि लोचनीं तेज लाभलें तिजला तारांचें
कायेला लाभली तियेच्या कान्ति केतकीची
तिचिया कण्ठामधें माधुरी वसे कोकिळेची !
तिच्या केश-पाशांत यामिनी जाउनिया दडली
जों गालावर तिच्या उषा ती उदयाला आली !
तिला कान लाभले शिम्पले विलग जणूं दोन
त्या शिम्पांतिल मोती खुलती आणि कुडच्यांतून !
स्त्री-वृन्दांतुन जातांना ती नजरेला पडली
-आणि न पुसतां हृदयीं माझ्या जाउनिया बसली !
हळू हळू पाउलें टाकितां गेली ती निघुनी
तों तरङ्ग किति उद्भवलें ह्या हृदय-सरामधुनी !
स्त्री-वृन्दातुन जातांना ती नजरेमधिं भरली
चन्द्र-कोर तारकामधें ती मन्मनास गमली !

[ ४ ]

स्त्री-वृन्दांतुन जातांना ती नजरेला पडली
आणि न पुसतां हृदयीं माझ्या जाउनिया बसली !
दूर दूर ती गेली चालत, जशी राज-हंसी
मद्-हृदयाला ओढित, छे ! त्या मृदु बिस-तंतूसीं !
जातांना परि तिचिया वेणीवरुन ओघळली
पुष्प-मालिका; ( इन्द्र-धनू चारुताच कीं सरली ! )

तों ती उचलुनि मी हृदयाशी ह्या माझ्या धरिली
कीं हृदयींच्या तिच्या मूर्तिला परत जणुं केली !
आणि सेवितां गन्ध तियेचा झालो मी धुन्द
तेव्हांपासुन मना लागला तिचा एक छन्द
दुःख-काळजी ह्यांनीं हा जों जीव क्लान्त व्हावा
विरङ्गुळा मज तों त्या मालेमधींच लाभावा !
तिनेंच मजला दिधल्या पुढती किती प्रेम-भेटी
परि त्या मालेपुढती मजला फिक्याच त्या गमती !

[ ५ ]

आणिक एके दिनीं फिराया जातां नदिकांठीं
प्रसंग घडला चमत्कृती-मय ( जडण्याला प्रीती ! )
आली होती तिच्या मैत्रिणीसह ती पाण्याला
चन्द्र-कला जणुं तारासंगें ध्वान्त हरायाला
होता वर्षा-ऋतू बहरला तेव्हां चोंहिंकडे
पूर येउनी नदीस पाणी क्षणाक्षणास चढे !
घट बुडवियला तिनें, वांकली काढाया वरती
घाटावरला पाय घसरला ! जलांत पडली ती !
प्रसंग आला तिजवर बांका, नुरोनि मज भान
उडी घेतली ! तिला गांठिलें पाणी कांपून !
आणियलें तिज कांठावरती, मूर्च्छा घालविली
त्या तसल्याही क्षणीं मला ती जल-देवी गमली !

पडला खालीं मैत्रिणिचा जिव ! तिचा मिळे तिजला !
तेव्हांपासुन प्रेम लाभलें आणि तिचें मजला !

[ ६ ]

प्रीति-लतेचें बीज परस्पर-हृदयामधिं रुजलें
जीवितांतल्या आणि वसन्तें त्यानें पालविलें
कधीं कधीं अश्रुंनीं नयनिंच्या त्यातें जोपियलें
अन् ते कालान्तरें बहरुनि कलिकांनीं गेलें !
हाय ! परी त्या फुलण्या-आधिंच कुणीतरी खुडल्या।
आणि बिचाऱ्या पाय-दळीं त्या कुणीतरी चुरल्या !
तों तिनें नि मी अश्रू ढाळिले त्यांतें फुलवाया
तुटला तारा जणूं अम्बरीं सजलीं चढवाया !
परस्परांच्या हृत्फलकावर चित्रें काढियलीं
देहामधल्या रुधिरानें तीं आम्हीं रंगविलीं !
परस्परातें देखाया जों आम्हां हो बंदी
तों लावियलें जीवाला त्या चित्राचे नादीं !
पाय-दळीं त्या कलिका चुरल्या ! आंत हृदय तुटतें
काय तऱ्हा ही ! प्रीती जडणें गुन्हा होय येथें !

[ ७ ]

प्रीती जडली मजवर हा तर झाला काय गुन्हा ?
तिनें दिल्या तों मजला भेटी-छे त्या प्रीति-खुणा !
परी घेतल्या कुणीतरी त्या हिरावून दैवा !
काय आमुचा अमुच्याजवळी रहावा न ठेवा ?

तगमग तगमग तोंच आमुच्या चाले जीवाची
दिशा पालटे अमुच्या आतां जीवन-ओघाची !
जवळ जवळ पातलेच होते ओघ संगमाया
तोंच तिच्या-माझ्यात जाहल्या उभ्या टेकड्या ह्या !
अतां एकमेकाविण क्रमणें पुढला तो मार्ग
ह्याच विचारें स्मशानसें कीं गमती फुल-बाग !
अन् आतां कोठुनी मिसळणें श्वासामधिं श्वास ?
असेंच वाऱ्यावरी सोडणें हळवे निःश्वास !
'काय माधुरी फुटकळ असल्या करुण कहाणींत ?'
येई आतां परी कळोनी—'कशी असे प्रीत ?' !

१–९–३५
पुणें.

—वसन्त चिन्धडे, B. A. (Hons.)

# प्रेमाचा खेळखंडोबा : ५

( मोहक शृंगार करून समाजात डौलानें मिरविणाऱ्या प्रेमाच्या होतकरूं उमेदवारानो, पुढील विचार मांडल्याबद्दल मी आपली अत्यंत नम्रतेनें क्षमा मागतो. )

( ' प्रेम ' या शब्दोच्चाराबरोबर मनांत कित्येक भावनांची गर्दी उमळते. स्वामी व सेवक, मातापुत्र अथवा पितापुत्र, बहिणभाऊ वगैरे लोकांत असणाऱ्या शुद्ध व निर्विकार भावनाना प्रेम म्हणून संबोधितात; आणि त्याबरोबरच आजकाल इतरेतर तरुणतरुणींच्या मनात थैमान घालणाऱ्या अद्वितीय भावनेलाहि प्रेमच म्हणतात. परंतु ही भावना वर सांगितलेल्या भावनेपेक्षा अजिबात निराळी व निकस आहे. तेव्हा ती विभक्त केलीच पाहिजे. निदान केवळ निराळें नाव देऊन तरी तिला बाजूस काढली पाहिजे. प्रेम या व्यापक नावाखालीं तिचा समावेश केल्यानें शुद्धाशुद्ध भावनांची भेसळ होते. )

आजचे जगद्विख्यात् आंग्ल नाटककार बर्नार्ड शॉ यांनी ज्याचे विरुद्ध मोहीम चालविली आहे त्या पाश्चिमात्यांच्या लटक्या व नाटकी आचारात 'प्रेम' या अजब गोष्टीला पहिलें स्थान दिलें जातें. आणि आजकाल आंग्लसंस्कृतीबरोबर हिंदु समाजाची घसट वाढती असल्यामुळें या सासर्गिक हृद्रोगाचा फैलाव आपल्याकडेही अत्यंत जोरानें चालू आहे. आधुनिक गद्य, पद्य, नाटकें, चित्रपट इत्यादि बहुतेक सर्व वाङ्मयात तरुणतरुणींच्या प्रेमाच्यान्च मात्राचे वळसे दिलेले आढळतात. प्रेमास थोडया अवधींत बरेंच महत्त्व प्राप्त झाले आहे.

प्रेमासाठीं कोण काय करणार नाहीं ? शेतात लहानशी निवाऱ्याची जागा करून राहणाऱ्या म्हाताऱ्या शेतकऱ्याचा 'गनू' बापानें निढळ्या घामानें, पै पै करून जमविलेल्या तुटपुंजीची, 'संद्रीला' 'शिनिमानाला' जायचं म्हणून तिच्या चरणावर बेधडकपणें रास करील. तर बादशाही थाटानें मौल्यवान् सिंहासनावर विराजमान् होणारा सम्राट् एका क्षणांत त्याखालीं उतरून, त्यावर तुच्छतेनें लाथ मारून आपल्या हृदयदेवतेच्या मागें कुठल्याकुठें दूर निघून जाईल. कवि काव्यसुमनाची अंजलि वाहतील, तर हृदयस्थ सखीच्या गळ्यात देदीप्यमान् रत्नहार घालण्यासाठीं एकादा शास्त्रज्ञ आकाशातील तारकाना गवसणी घालूं लागेल ! प्रेमासाठीं वाटेल तो वाटेल तें करील !—अशा या प्रभावी प्रेमाच्या फेऱ्यांत प्रत्येक मनुष्यप्राणी साधारण सोळा ते बत्तीस या आयुर्मर्यादेंत एकदा तरी सापडला पाहिजे असा कोणी एक तत्वज्ञानी सिद्धान्त काढतात.

अशा रीतीनें साऱ्या जगाला भुरळ पाडणाऱ्या प्रेमात काय अजब जादू सामावलेली आहे याची कल्पना फारच कमी लोकाना आहे असें वाटते. 'तरुणतरुणींना एकमेकांबद्दल 'काहींतरी' वाटणें' या उक्तीचा खोल विचार न करता त्या 'काहींतरी' ला वरवरचें 'प्रेम' असें प्रशस्त नांव दिलेले आढळतें. उलट या 'काहींतरी' चा गूढार्थ यत्किंचित्‌ही प्रकट न करण्याची खबरदारी घेण्यांत येते. परंतु त्या बिचाऱ्याना सुचवावेंसें वाटतें कीं, अशा या प्रेमाच्या चित्र-

विचित्र आणि सभावित पावरुणाखालीं स्वत:च्या नैसर्गिक भावना झाकून टाकल्या तर ते उत्तरोत्तर आत्मवचनेच्या मार्गाकडे वळतील.

सर्व भूतलावर जिचें अखडपणें साम्राज्य चालत आलें आहे व याही पुढें चालेल अशा विषयवासनेचे इतरेतर तरुणतरुणींतील 'प्रेम' व 'विवाह' हे दोन अवतार आहेत. इग्रजी पुराणात सागितल्या-प्रमाणें जगाचे आद्य मातापितर ईव्ह—आदाम यानी ज्ञानाच्या वृक्षाचें फळ खाल्लयापासून ज्या एका दिव्य शक्तीचा प्रवेश त्याचें शरीरांत झाला, जगाच्या सुरुवातीपासून जो एक भावनारोग प्राणि-मात्राम कायमचा जडला, त्याचेच नाव विषयवासना! आता या भावनाची पूर्ति करणें मानवकोटीचें कर्तव्यच आहे आणि या पूर्तीसाठीं स्त्रीपुरुषातील आकर्षण स्वाभाविकच आहे. ह्या आकर्षणालाच 'काहींतरी' उर्फ 'प्रेम' म्हणतात. वास्तविक पाहतां या नैसर्गिक आकर्षणाला प्रेम हें व्यापक नाव देणें म्हणजे त्या शब्दाची विटंबना करणें होय. परतु आधुनिक तरुणतरुणींचीं मनें कमकुवत आहेत हें अजिबात विसरून चालणार नाहीं.

वरील विचारप्रणालीवरून असें म्हणता येईल कीं मनुष्याच्या संसार—नाटकाला 'प्रेम' (तूर्त आपण प्रेमच म्हणू) ही एक प्रस्तावनाच आहे. त्यामधून संसाराची नादी विवाहाची मगल सुमनें उधळून सुरू केलीच पाहिजे. आणि त्या सूत्रधाराला त्याच्या प्रेमळ नटीनें लगबगीनें बाहेर येऊन साथ दिल्याशिवाय नाटकाला रंग कसा चढणार?

'प्रेम! प्रेम!!' या शब्दातून गंभीर ध्वनी काढणाऱ्या आधुनिक प्रेमवेडयाची कींव करावी तेवढी थोडीच. शारिरीक सौख्य मिळण्याचे अगोदर प्रेमाच्या मागें 'शुद्ध' 'सोज्वल' 'नि:स्वार्थी' इत्यादि विशेषणें हे प्रेमवेडे लावण्याचा प्रयत्न करतात. परतु त्याबरोबरच 'नेत्रोत्सव, सानिध्य व स्पर्श' या पायऱ्या नकळत चढून जातात. आणि शेवटीं नकळतच वैषयिक वासनेचें आत्यंतिक शिखर गांठल्या-नंतर झालेल्या गोष्टीबद्दल अचवा करीत डोके धरून बसतात. दांभिक व आपलपोटया मनानें केलेली फसवणूक पूर्णपणें कळून येते

त्याना !—त्याचप्रमाणे वसंतऋतूंत नाविन्यानें बहरलेल्या लतां-कुजाखालीं शुद्ध प्रेमाचें गोड गुंजन करताना प्रेमी युगुलाच्या हृदयांवर दरोडा पडून ती नाहींशी झाल्याचा त्याना भास होतो. परंतु याचवेळीं त्याना कळत नाहीं कीं, ह्या प्रेमाच्या खेळखंडोबावर लौकरच विषयाचा भंडार उधळून तो उरूस खलास केल्यानंतर जनापवाद व आत्मनिंदा याचा पावसाळा सुरू होतो. आणि नंतर या पावसाळयाच्या मोसमात लग्नाची बेडी मुद्दाम अडकवावी लागल्यामुळें ससारवृक्षाचा फैलाव झाल्यास नवल तें कसले ? आणि याच स्थितीस, पूर्वीचें शुद्ध, उदात्त व गंभीर असलेलें प्रेम व आताचे भावना व विकार यानी लडबडलेलें प्रेम याचा तुलनात्मक दृष्टीनें विचार करून 'प्रेम' म्हणजे 'हेंच' असें मतपरिवर्तन केलें जातें. आतां याहीपुढें जरा खोल गेल्यास आपणांस असें दिसेल कीं लग्नानंतर ही प्रेमभावना तितकीच प्रबल रहात नाहीं. त्या भावनेंतील अंतःस्थ हेतु पूर्ण झाल्यावर त्या भावनेची कृष्ण पक्षातील चंद्राप्रमाणें स्थिति होते. आणि नंतर क्वचित् प्रसंगीं घटस्फोटा-सारख्या प्रसंगानें अमावस्येचा अंधारही चोहोकडे दाटतो. थोडक्यात म्हणजे प्रेमाचे निर्झर शुष्क पडणार नाहींत अशी हमी कोण देतो ? ब्राऊनिंग कविनेंही एके ठिकाणीं हेंच प्रतिपादिलें आहे. प्रेमाच्या नविनतेचें नऊ दिवस असतात. तें जसजसें जुनें होतें तसतसें—

" Lovers grow cold and men learn to hate their wives !"

ह्यावरून इतकेंच म्हणता येईल कीं प्रेमाची वाढती आकांक्षा शारिरीक सुखाचे पुढें जाऊंच शकत नाहीं.

कॉलेजातील तरुणतरुणींच्या मैत्रीला असल्या प्रेमाचा जबर दर्प येतो. अशाच एका तरुणास सवाल टाकला कीं 'तुझं तिचें काय नातं ?' तर गंभीर चेहरा करून पठ्ठा दडपून सागतो कीं,—'तिचं माझं बहिण—भावाचं नातं आहे ! उगाच वेडयासारखं बहकू नका कहीं-तरी !' आतां या सूज्ञाला विचारावें कीं या मानलेल्या बहिणीच्या प्रेमास्तव वैसे खुळखुळणारा तूं, सख्या बहिणीला भाऊबिजेच्या

दिवसाखेरीज स्वखुषीनें, आनंदानें एक तरी नाणें हातावर देतोस कां ? मानलेली बहिण घरीं आली असतां ' यावं यावं ' करणारा, तिच्या हातांतील सायकलही घेऊन नीट एका बाजूस ठेवणारा तूं घरच्या ताईबद्दल कुठली वृत्ति दाखवतोस ? गाठच्या बहिणीपेक्षां या उसन्या बहिणीचाच लागाबांधा अधिक घट्ट असणें हा सृष्टीचाच नियम दिसतो तर ?

प्रेमाचे कसलेले आंग्ल प्रवचनकार शेले यांनी जरी उच्च आमना-वरून प्रेमाचें बावनकशित्व वर्णन केलें तरी त्याच्या विचारांच्या सूक्ष्म विश्लेषणावरून तो बिचारा स्वतः शारिरीक सुखासाठीं किती हपापला होता, हें स्पष्ट दिसतें. एकीकडे—

" One word is too often profaned
For me to profane it.
One feeling too falsely disdained
For thee to disdain it ! "

असें ठासून सांगणारा गृहस्थ दुसरीकडे मोठया काकुळतीनें विनवितो कीं—

" O lift me from the grass !
I die, I faint, I fail

... ... ... ... ...

My heart beats loud and fast
O press it close to thine again
Where it will break at last ! "

परंतु ब्राऊनिंग या कविनें प्रेमाचा खराखुरा अर्थ निर्भीडपणें मांडला आहे. प्रेमाचे सर्व रस्ते रंगमहालांत येऊन मिळतात असा त्याचा सिद्धांत व हट्ट आहे. केवळ समाजशक्ति, धर्मप्रभाव, नीतीचें फाजील अवडंबर वगैरे मामुली गोष्टींना भिऊन न जातां प्रेमाचा शेवट मधुर मीलनांत केला तरच तें प्रेम असें त्याचें मत आहे.

निसर्गातील नितांत प्रेमाची वाटेल तेवढीं उदाहरणें घ्या. विश्व-कर्म्याच्या आज्ञेनें आपापल्या प्रणयी जीवांना हृदयाशी घट्ट धरून

मनुष्यमात्राला ‘ प्रेम ’ म्हणजे ‘ शारिरीक मीलन ’ हाच धडा निसर्गाचा प्रत्येक हस्तक देत असतो. बिचारी नदी ! स्वतःच्या संवेदना आपुलकीच्या भावानें व लडिवाळपणानें सांगण्यासाठीं सागराच्याच कुशींत लपते ना ? ‘ प्रेम म्हणजे मीलन ’ असें बजावून सांगणारी विद्युल्लता मेघाच्याच मांडीवर बसून मिस्किल हास्य करते ना ?—एकूण निसर्गाच्या व मानवी जीवनाच्या संगीताला मुख्य साथ ह्या प्रेमाचीच आहे. परंतु मानवी प्रेमाचे निनाद मात्र सौंदर्य, संपत्ति व समाजप्रतिष्ठा यातून निघत असतात. या त्रयीचें ज्याला एकजुटीनें पाठबळ असेल त्याला जगाच्या बाजारांत प्रेम तरी महाग पडणार नाहीं हें निश्चित !

आतां अधिक विचारांतीं असें आढळेल कीं, प्रेमाची पहिली कोनशिला सौन्दर्याचे चिकित्सेनंतर बसते. ‘ Love's special lesson is to please the eye ! ’ असें एकानें म्हटलेलेच आहे. त्या बरोबर हेही उघड आहे कीं सौन्दर्याची व्याख्या व्यक्ति व्यक्ति-बरोबर बदलूं शकेल. तरीही एक सत्य कायमच राहते कीं सौंदर्याच्या कमीजास्त प्रभेमुळें प्रेमाचा प्रभाव कमीजास्त व्हावयाचाच !—म्हणजे अर्थ असा कीं, एका सौन्दर्योपभोगानंतर त्यापेक्षां सरस असणाऱ्या सौन्दर्याची भूल पडावी व नंतर पहिलें सौन्दर्य निस्तेज वाटावें हें प्रेमासाठीं भुकेलेल्या हृदयाला साहजिकच आहे. कॅम्पबेल म्हणतो —‘ Love's a fire that needs renewal of fresh beauty for its fuel ! ’ आणि तंतोतंत याच विचाराचें पोटीं घटस्फोट अर्थात् ‘ प्रेमाची दिवाळखोरी ’ या वैचित्र्याचा जन्म आहे.

एकंदरीत—

मागें सांगितलेल्या आदाम—ईव्ह या तरुणतरुणीनें जरी प्रथम प्लेटॉनिक उर्फ निःस्वार्थी प्रेमाची खुळेपणानें घोषणा केली तरी त्या प्रेमाचें रूपांतर कशात झालें याची ग्वाही त्यांची गोरी लेंकरें ( सर्व ख्रिस्ती आदाम—ईव्हाचे वंशज होत ) मुकाट्यानें देतच आहेत. ही तरुणतरुणीं दैवी होती; तेजःपुंज होती. परंतु त्यांनासुद्धां प्रेमाचा वेडावाकडा अर्थ करतां आला नाहीं. तेव्हा प्रेमाच्या रोपट्याला

पाणी घालणाऱ्या संसारीक शेतकऱ्यानों, शेवटीं एकच गोष्ट सुच-वावीशी वाटते कीं असलीं प्रेमाचीं उबदार, चित्रविचित्र ब्लँकेटें पांघरून स्वतःच्या भोंवती आत्मवंचनेचा अंधःकार करू नका! त्यांत तुमचीच हानि आहे.

थोडक्यात म्हणजे सामान्य तरुणतरुणींतील होणाऱ्या आकर्षणाला 'प्रेम' हें दिशाभूल करणारे, अत्यंत व्यापक असें नांव न देण्याची खबरदारी घ्या. जगत् व जगन्नियंता, मातापुत्र अथवा पितापुत्र, बहिणभाऊ वगैरेंच्यातील असणाऱ्या गाढ, निर्विकार, आपुलकीच्या भावनेला 'प्रेम' म्हणतात. मदनप्रेरित भावनांवर 'प्रेम' असा धड-धडीत खोटा छाप मारून त्याना या दिव्य प्रेमाच्या पक्तीस बसविणें म्हणजे सहभोजन होय. केवळ मानवी जीवाच्या कर्तव्यासाठीं ही भावना उपजत असून ती धीटाइनें जशीच्या तशी प्रकट करण्यास कचरण्याचें कांहीं कारण नाहीं. प्रेमाच्या वरूनवरून सुंदर दिस-णाऱ्या बुरख्याखालीं लपून कार्यभाग साधू बघाल तर स्वतःची फसगत झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

—पुष्पहास भ. नागपूरकर.

# तिची, 'ही–' : : ६

ती गोष्ट वाचून संपवताच अमृतच्या डोळ्यांत पाणी आलें! खरोखर किती सुंदर गोष्ट तिनें लिहिली होती. त्यानें पुनः पुनः त्या गोष्टीचें नाव मनाशीं उच्चारलें आणि तसाच खोलींत येरझारा घालूं लागला तो. स्त्री–हृदय स्त्रियांनींच रंगवावें अशी त्याची खात्री झाली. कारण, स्त्री–पुरुषांच्या हृदयाची रचना एक असू शकेल पण त्यांतले तरंग? विचाराची सूक्ष्म खळबळ, निसर्गानें ठरवलेली अन् विश्वानें गाजिलेली कोमलता... एक ना दोन, कितीतरी बारीक बारीक पापुद्र्यांनीं तें आच्छादलेलं असत! अमृतला तर तिच्या मोहक भाषेनें भुरळच घातली; आणि त्या विचारपुष्पांच्या शय्येखालीं जीवितातली सत्य–सरिता मंद गतीनें स्रवत होती. एका सुकुमार तरुणीच्या जीवनाला काळोखी लागून त्यातच ती बिचारी गतप्राण झाली, ह्याचें हृदयविदारक शब्दकाव्य तिनें कल्पिलें होतें. अमृतला तर ती एखाद्या सत्यकथेसारखी भासली. आणि कांहीं तरी

विचार करून त्यानें कपडे चढविले. तोंच खोलींत शशी आला. त्याला पहातांच अमृत म्हणाला, " अरे ही गोष्ट वाचलीस कां ? "

शशीनें उत्तर न देताच तें पुस्तक मिटवून त्याला म्हटलें, "मला नाहीं बुवा लघुकथा वाचायचा शोक ! "

" आणि लिहायचा शोक आहे वाटतं ? "

" नाद म्हणेनास ! "

दोघेहि क्षणभर हासले.

काहीं वेळानें शशी म्हणाला, " अमृत, खरंच मला अतिशय वाईट वाटतं ती वाचून ! "

" अगदीं खरं आहे तुझं म्हणणं ! अरे त्या तरुणीचे ... " त्याला पुढें न बोलूं न देता शशी मध्येंच म्हणाला.

" त्या दृष्टीने नव्हे...बर...जाऊ दे तें... "

आपल्यापासून शशी खास कांहींतरी लपवून ठेवतों आहे अशी अमृतची खात्री झाली. मग त्याच्या पाठीवर हलकेच थाप मारून तो म्हणाला, " शशी, Is there anything striking ? "

शशीनें नुसतें मानेनें नाहीं म्हटलें. पण अमृतला मात्र अगदीं राहवेना म्हणून शशीचें दोन्ही हात धरून त्यानें मोठ्या कळवळ्यानें म्हटलें, " मला माहीत आहे कीं तुझ्या मनांत काहीं तरी दुःखकारक विचार आला की तूं अशीच टाळाटाळ करतोस ! मीं आत्तांच ताईच्याकडे निघालों होतो. येतोस बरोबर ? "

" कुठें ? ताईकडे ?" इतकें बोलून शशीनें अशी चमत्कारीक मुद्रा केली, कीं ती पाहून अमृतला अधिकच विस्मय वाटला. त्याला आपल्याबरोबर येण्याचा खूप आग्रह केला त्यानें. पण तरी सुद्धां तो येईनाच ! अखेर खोलीबाहेर पडतांना मात्र गंभीरतेनें शशी म्हणाला, " मी यापुढें ताईकडे कधींच येणार नाहीं ! "

अमृतला तर याचें फारच आश्चर्य वाटलें. वाटेल तेव्हां आपल्याला बळजबरीनें ओढून ताईच्याकडे लघुकथा इत्यादींवर तासन् तास बोलत राहणारा शशी हाच कां अशी त्याला शंका आली. फिरून

एकवार त्याला त्यानें विचारून अखेरीस अमृतनें सायकलवर टांग टाकली आणि ताईकडे तो निघाला !

जातांना त्याला शशीच्या बोलण्याचें फारच नवल वाटत होतें. त्याच्या मनांत एक शंका आली पण त्यानें मनालाच दोष दिला. मात्र ताईच्या गोष्टींत जादू आहे खास, अशी त्याची सारखी खात्री होत चालली. तो आपल्या विचारात इतका गर्क झाला होता कीं, वाटेनें जाणाऱ्या त्याच्या स्नेह्यांनीं केलेला त्याच्या नावाचा उच्चार नि सलामी देखील त्याला कळली नाहीं. माणूस कधीं कधीं जगांत राहूनच जग विसरतो ह्याचा त्याला नकळत प्रत्यय येऊन गेला असावा. आणि जेव्हा तो ताईच्या घराजवळ आला तसतसा त्याच्या मनात अधिकच गोंधळ झाला. तसेंच पुढें जावें असें त्याला वाटलें पण तो उतरलाच त्याच्या घरापाशीं !

आजकालच्या प्रतिथयश लेखकांत ताईचें स्थान बरेंच वरचें होतें. त्याचीं मोहक वर्णनें अन् हृदयद्रावक समाजचित्रे कुणालाही वेडावून टाकीत. अमृत जों घरात पाऊल टाकतो न टाकतो तोंच एक वृद्ध गृहस्थ त्याला म्हणाले.

" अरे अमृत, आमचं अमृत प्यायला येना ? "

बाबाच्याकडे जाऊन दोन शब्द बोलण्यानें आपण आपली उत्सुकता निववीत आहों असें त्याला वाटलें. पण त्याच्याशीं असें वागणें बरें नव्हे म्हणून तो त्याच्याकडे जात म्हणाला, " बाबा अगदीं सकाळीं दूध प्यायला मजा वाटते. आत्ता काय त्याची गंमत ! "

" नुसत्या तोंडानें म्हणतोस, येत मात्र नाहींस. अरे दूध म्हणजे अमृत आहे अमृत!" त्यांनीं विडी पेटविली; आपल्या केशविरहीत मस्तकावरून हात फिरवीत ते म्हणाले,

" अरे ही तुमची ताई तर याच अमृतावर वाढली बरं. विचार पाहिजे तर तिला—"

नेहमीचें दुग्धपानाचें महत्त्वाचें पुराण ऐकण्याऐवजीं त्यानें कप-भर दूध घेतले आणि तो वर गेला. जातांना बाबा कांहींतरी म्हणाले,

पण त्याच्याकडे त्याचें लक्ष नव्हतें. मात्र जेव्हां तो ताईच्या खोलींत गेला तेव्हा ताईंना खिडकीपाशीं बाहेर पाहात असलेल्या पाहून त्यानें हलकेंच म्हटले, "ताई ?"

इतक्यांत ताईंनीं मागें वळून मंद स्मित हास्य केलें. त्यांची उंच आणि नीटस देहयष्टी खिडकीबाहेरच्या प्रकाशात मोठी सुंदर दिसत होती, त्याचें कपाळ नि डोळे किंचित मोठे असल्यासारखा नुसता भास होत होता. पण त्याच्याकडे वारंवार जाणाऱ्या अमृतला त्याच्या विपर्यांचे असलें कौतुकवृत्तीने केलेलें निरीक्षणाचें किंवा त्यानीं अगदीं चापचोपून पण मोहकतेनें नेसलेल्या शुभ्र पातळाचें कांहींच वाटलें नाही. तो खुर्चीवर बसतच म्हणाला, "फारच सुदर आहेत बुवा नव्या गोष्टी !"

ताईहि पण आपल्या खुर्चीवर बसल्या आणि हातांतल्या वस्तूशी चाळा करीतच त्यानीं पुन: एकदा मंदस्मित केलें.

"पण त्यातल्या त्यात ती 'ही' गोष्टीनेंच मला फार वेड लावलें !"

ताईंनीं जरा चमकून त्याच्याकडे पाहिलें.

"का हो असं कधीं शक्य आहे का स्त्रियांच्या बाबतींत ? आणि समजा, त्या मुलीनें आपल्या प्रेमासाठीं तस केलं तर तुम्हांला त्याचा इतका राग कां यावा ?"

ताईंनीं किंचित् खिडकीबाहेर नजर फेंकून म्हटलें.

"अरे सुशिक्षित स्त्रियांनीं तरी असं मूर्खासारखं वागूं नये इतकंच माझं म्हणणं. आणि शिवाय---मी–" त्यानीं मध्येंच थांबल्यासारखें करून म्हटलें, "मी तर त्या तरुणीभोंवतीं अतिशय उदात्त अन् उच्च वातावरण निर्माण केलं आहे. तुला काय वाटतं ?"

"त्याबद्दल नाहीं मला कांहीं म्हणायचं. कारण अकालीं मातृपद हें मी त्याज्य ठरवतों पण ...

"पण काय ! हाच तिचा मूर्खपणा. परोपरीनें तिच्या मैत्रिणी तिला विनवीत होत्या पण अखेर ती प्रवाह पतितच झाली ! तुला नाहीं आवडला माझा शेवटला उद्गार ?"

" तें सार खरं आहे ताई. पण तिच्या सुशिक्षित मैत्रिणींना वाईट वाटलें म्हणूनच ना तिनें जिवाचा त्याग केला ? आपल्या कलंकामुळें मैत्रिणींना कमीपणा येईल म्हणून —"

मधेंच ताई म्हणाल्या, " अरे पण आधीं इतकं बेताल व्हावं कां माणसान ! आणि त्यातल्या त्यात स्त्रीनं ?" यावर अमृत गप्प बसला. मात्र या वेळीं जर शशी असता तर त्याने ताईंना जबाब दिला असता, अशी कल्पना त्याच्या मनांत येऊन गेली, तोंच ताई म्हणाल्या, " " अरे शशी बरेच दिवसांत आला नाहीं रे ?"

त्यांच्या ह्या प्रश्नानंतरची त्याच्या चेहेऱ्यावर झालेली सूक्ष्म भावनाची चलबिचल त्याच्या ध्यानांत आली नाहीं. त्यानें कांहीं तरी सबब सांगून नतर तो जाण्यासाठीं म्हणून उठला तेव्हां ताई म्हणाल्या, " पुढल्या महिन्यांत मी मुंबईला जाणार आहे अमृत !"

अमृतला त्याचें कांहींच नवल वाटलें नाहीं पण जेव्हा त्या 'कायमच हें पुणं सोडून–' असं म्हणाल्या तेव्हा तो म्हणाला, " आणि नोकरी ?"

" अरे दुसरी छान आली आहे."

" पण तुम्ही या संस्थेत आजन्म सेविका म्हणून..."

" तुला रे काय त्याची पंचायती ?" कधींही न चिडणाऱ्या ताईचें तें शब्द ऐकून त्याला वाईट वाटलें. आणि अधिक चौकशी न करताच तो निघाला !

आणि आठ दिवसांनीं पुन: जेव्हां तो त्याच्या घरीं गेला तेव्हां बाबांनीं त्याला सारी हकीकत कळवली. ताईनीं राजीनामा कां दिला, त्याच्याकडे येणाऱ्या मित्राचें येणें संस्थेच्या चालकाना कसें आवडलें नाहीं आणि मग त्याना बोर्डिंगमधून काढून टाकलें येथ-पासून तो परवां ज्या एका घटनेनें ताईना ही नोकरी सोडावी लागली तेथपर्यंत सारीं हकीकत त्यानीं सांगितली. आणि हें सागताना त्यांना कितीतरी वेळा विडीच्या झुरक्यासाठीं थांबावें लागलें, आणि केस...येतील या आशेने त्यांनीं डोक्यावरून हात फिरविला. तें सारं

अमृत नीट न्याहाळत होता. शेवटीं तो म्हणाला, " पण बाबा तुम्ही नाहीं गेलां मुंबईला ?"

" अरे आम्हीं आपले गवळी ! तुमच्या ताई......"

ताई मिळवत्या असून बाबा इतक्या वयापर्यंत हा दुधाचा धंदा कां करतात हेंच त्याला कळलें नव्हतें. कदाचित कामाची आवड हीच वृत्ती त्याच्या मुळाशीं असावी, असा विचार करून तो स्वस्थ बसे. मात्र ताई ह्या बाबतींत बाबाशीं कशा फटकून वागत याचा प्रत्यय त्याच्या बोलण्यात अन् वागण्यांत अमृतला आला होता. त्याला हें सारे चमत्कारिक वाटे. पण असा विचार करताना, आतां यापुढें आणखी कुणाशीं अशी मनमोकळी चर्चा करणार नि बोलणार, या कल्पनेनें फारच वाईट वाटलें त्याला. यापुढें ताईच्याकडे कसें जायला मिळणार, आणि हवी ती नवी पुस्तकें वाचायला मिळणार, या एकना दोन विचारानीं त्याला अकारण बेचैन केलें. तो तमाच ताईचा मुंबईचा पत्ता विचारून घरीं आला. आपल्या खोलींत बेऊन तो इकडे तिकडे फिरतो आहे तोच शशीकडून निरोप घेऊन कुणीतरी गडी आला. त्याला उत्तर देऊन अमृतनें पुनः एकवार ताईच्या नव्या पुस्तकाची पानें चाळलीं ! आणि काहीतरी मनाशीं निश्चय करून त्यानें त्या दिवशीं ताईना पत्र धाडलें. आणि ठरल्या-प्रमाणें तो आणि शशी जेव्हा सिनेमाला जायला निघाले तेव्हां वाटेंत पत्र टाकण्यासाठीं त्यानें पोस्टाकडचा रस्ता धरला. तेव्हां शशी म्हणाला, " कुणालारे पत्र धाडतो आहेस ? "

" ताईना "

" ताईना ? " शशीच्या मुद्रेवर न दिसलेली त्वेषाची छटा आजही अमृतला स्पष्ट दिसून आली ! शशीला त्यानें अनेकदा निरनिराळ्या तऱ्हेनें विचारून पाहिले पण शशीनें त्याला तसेंच डावलले. चित्रपटा कडे तरी त्याचे लक्ष होतें कां नाहीं कुणाला ठाऊक ?

सरासरी दोन महिने होऊन गेले या गोष्टीला. तरी ताईचें उत्तर म्हणून नाहीं. बरं एखाद्या मासिकांत गोष्ट देखील आढळली नाहीं, त्यामुळें अमृतला तर उगीचच काळजी वाटूं लागली. ताई त्याच्या

खरोखर ताई शोभत होत्या. आदराच्या पोटींच त्यांच्याविषयीं त्याच्या मनांत निरनिराळे विचार येऊन गेले. मध्यंतरी एकदोनदा तो बाबाच्याकडे जाऊन आला पण त्याच्याकडून त्याला विशेष कांहींच कळलें नाहीं; उलट 'त्या काय शिकलेल्या अवसट पोरी—' असा मात्र उद्गार त्याच्या लक्षांत राहिला ! त्याची परीक्षा जवळ येत चालली होती त्यामुळें हा विचार तो दूर करण्याचा प्रयत्न करी तों अधिकच त्याला बिलगू लागे. आज सहज ज्ञानप्रकाश चाळीत असताना एका विलक्षण मथळयानें त्याला अधिकच घुटमळयात टाकलें--

" एका सुप्रसिद्ध लेखिकेचा विवाह ? "

त्याच्या डोळयापुढें ताईच कां याव्यात याचेंहि त्याला आश्चर्य वाटले ! आणि तो तशा स्थितींत असतानाच एक वृद्ध गृहस्थ आल्याची वर्दी गडयानें दिली !

बाबाना आलेलें पाहातांच तो गडबडला. त्यांना खोलींत मोठया आदरानें बसवून त्यानें त्याचें स्वागत केलें. पण काय बोलावें हें त्याला सुचेना. जवळचा 'ज्ञानप्रकाश' त्यानें उगीचच मिटला. जणू काय तो आपलें मनच बंद करीत होता. पण लगेच नाना म्हणाले, " वाचलंस तू ? "

" काय बाबा ? "

" अरे ताई लग्न करणार आहे !" त्यांच्या मुद्रेवर समाधानाची छटा उमटून गेली.

" पण......... ..? " तोंच बाबांनीं एक पत्र त्याचे हातांत दिलें.

ताईचे होतें तें पत्र. तें आपण कसें वाचावें अशी शंका त्याला आली पण लगेच त्यानें मजकुरावरून नजर फिरवली—

" बाबा, आईविना तुम्हीं मला लहानाची मोठी केलीत आणि शिक्षण दिलत याबद्दल मला तुमच्या करितां कांहीं करतां येईल कीं नाहीं कुणाला ठाऊक ? आपल्या लेकराच्या हातून कांहीं तरी उज्ज्वल घडावं म्हणून आईवडील त्यांना उज्वल करण्याचा यत्न करतात आणि खरोखर एखाद्या मुलाप्रमाणें तुम्ही मला स्वातंत्र्य

देऊन स्वावलंबी केलंत. तुम्हांला कितीतरी वेळां मी स्वस्थ बसा, प्रवासाला जा, म्हणून सांगितलें पण तुमची उद्योगप्रियता तुम्हाला सोडवेना. खरंच माझ्या वात्सल्याची उणीव तुमच्या साध्या शब्दांत असते. तुमच्यातला मानीपणाही माझ्यांत थोडाफार उतरला आहे, म्हणूनच मी पुण्याची नोकरी सोडली. तुम्हाला तें आवडले नाहीं हें मला समजत होतें. पण बाबा,—खरच मी अगदी गुदमरून गेलें होतें त्या वातावरणात! असो. आतां मी एका गोष्टीची नुमती अनुज्ञा मागणार आहे. मी, सुप्रसिद्ध साहित्याचार्य संत्रीकर ह्याच्या थोरल्या चिरंजीवाशीं विवाह करण्याचं योजिलं आहे! लहानपणी तुम्ही केलेली थट्टा आज खरी करुन दाखवतें आहे म्हणून नाहीं ना रागवणार! असो. अमृतची पत्रें मिळाली पण कामाच्या उलाढाली मुळे उत्तर लिहू शकलें नाहीं. यावें. क. हे वि."

आपली आज्ञाधारक

ताई—

अमृतनें पत्र वाचून बाबांच्या हातीं दिलें. त्याला हंसावें कीं काय करावें हेंच कळेना.

आपल्याला पत्र घाइलें नाहीं याबद्दल त्याला खरोखर वाईट वाटलें. पण ताई सुखांत आहेत ह्या कल्पनेनें त्याला किंचित बरें वाटलें. नंतर तो म्हणाला, " बाबा चहा सांगू का?"

परंतु बाबांनीं हंसत निराळाच प्रश्न त्याला विचारला " काय लिहू उत्तर ताईला?"

दोघेही पांच मिनिटें स्तब्ध होते.

अखेर जेव्हा चहा घेऊन बाबा बाहेर पडले तेव्हां म्हणाले,

" मुंबईला यायचं अं लग्नाला!"

त्याच्याशीं हास्य करून त्यानें त्यांचा निरोप घेतला. लग्नाच्या विरुद्ध असणाऱ्या ताईनीं आज एकदम लग्न कसें ठरविलं याचा त्याला अर्थ कळेना. कदाचित् तरुणपणांतील ' लग्न नको ' ही एक सभ्यतेची तऱ्हा असेल असें त्याला वाटलें. पण ताईच्यासारख्या

विचारी स्त्रीनें असें घरखोडीनें का वागावें हेंच त्याला कळेना. त्या दिवशीं शशीलाही त्यानें ही हकीकत सांगितली. पण त्याच्या मनावर काहींच परिणाम झाला नाहीं, असें अमृतला वाटले. पण त्याची ही संभ्रमावस्था दोनच दिवसांत दूर झाली. कारण ताईचें त्याला पत्र आले होतें. मग काय विचारता महाराज ? त्याला गगनांत मावेनसा आनंद झाला ! ताईचें गोड अक्षर नि हळुवार विचार यानीं त्याला मोहित केले आणि लगेच बाबाच्याकडे जाऊन त्यानें मोठ्या आनंदानें पेढे मागितले ! माणूस एकदा आपुलकीनें वागूं लागला कीं त्यात अतिशयोक्ति येतेच आणि प्रीतिच्या साहाय्याला अतिशयोक्ति असलीच तर माणूस अधच बनतो पण असली अंधता त्याला फार प्रिय असते. असल्या मुग्ध आनंदाच्या गुजगोष्टींनीं त्याच्या परिक्षेची प्रभात केव्हां झाली हें सुद्धां त्याला कळलें नाहीं. आणि भरकन त्यानें उत्साहानें परीक्षा आटोपून मुंबईला जायचें ठरविलं.

मुंबईला गेल्यानंतर आपण ताईची कशी थट्टा करूं नि मग त्यांना त्याचेंच पुस्तक भेट म्हणून देऊ आणि 'भावीची' मग ओळख करुन देताना ताई लाजतील कशा...अशा मनोहर चित्रानींच त्याचें स्मृतिपटल भरून गेलें. तो अशा हर्षात असतानाच त्याच्याकडे शशी आला. शशीला इतका गभीर त्यानें पूर्वी कधींच पाहिलं नव्हतें. त्याच्या शशीमारख्या मुखावर कसल्यातरी छायेचें दाट आवरण पमरल्यासारखा त्याला भास झाला.

"हॅलो शशी ? अरे ताईच्या लग्नाला येणार ना मुंबईला ? आपण खूपखूप चैन--"

"अमृत ! तुला बाबाच्याकडे न्यायला मी आलों आहे." एवढेंच बोलताना त्याला किती श्रम पडले !

पण त्याची चेष्टा करण्याचें सोडून अमृत चटकन् कपडे चढवून निघाला.

आज त्याला बाबांचें तें निवासस्थान किती भीषण आणि विषण्ण वाटत होतें !

अमृत तर अधिकधिक बुचकळ्यांत पडला. बाबा अगदीं खिन्न अंतःकरणानें काहींतरी करीत बसले होते. अमृतला अन् शशीला पाहातांच त्यांना अधिकच वाईट वाटलें. त्याना बाजूला बसण्यास सांगून बाबा म्हणाले,

" अमृत ! हेंच जर माझ्या कपाळीं होतं तर मी केव्हांच मेलों असतों ! "

अमृत यावर कांहीं तरी बोलणार इतक्यांत शशीनें त्याला खूण करून गप्प बसविलें.

सर्वत्र शांतता होती. अखेरीस बाबांनीं एक पाकीट त्यांच्यापुढें टाकलें ! काय भयंकर बातमी त्यांत आहे याची अमृतला कल्पना नव्हती. कदाचित्--तोंच शशीनें त्याच्या हातांत नोटपेपर दिला !

" माझं त्यांच्यावर अजूनही प्रेम आहे पण आपल्या दुर्दैवापुढें इलाज नाहीं ! असो. त्या इहलोक सोडून गेल्या आहेत तरी त्यांच्या ललितकृती अमर राहातील. माझ्यासारख्या अभाग्यावर ही सारी कहाणी लिहिण्याचा प्रसंग यावा ही विधिघटना होय. असो."

आपला

विश्वनाथ संत्रीकर

अमृतच्या डोळ्यांत पाणी आलें. ताईची निर्व्याज मूर्ति त्याच्या डोळ्यापुढें उभी राहिली !

बाबाची विषण्ण मुद्रा त्याला अधिक भीषण वाटली. काय बोलावें हें न सुचून तो तसाच शशीबरोबर घरीं परतला !

सारीं मासिकें नि वर्तमानपत्रें ताईसारख्या असामान्य लेखिकेच्या अकालीं निधनाबद्दल हळहळत होती !

दुसऱ्या दिवशीं त्याला एक पाकीट आलें त्यांत--

प्रिय अमृत,

" मी जें कांहीं तुला लिहीणार आहे तें वाचून तुला आश्चर्य वाटणें अगदीं साहजिक आहे, पण लोकांच्या मोकळ्या हृदयातून येणाऱ्या ध्वनिशलाका ह्या किती बद्सुर असतात ह्याची वास्तव चित्रें

काढणाऱ्या तुझ्या ताईच्या रिकाम्या हृदयांतून निघालेले सूर मी तुला ऐकविणार आहे. तुला आठवत असेल कीं मी ताईच्याकडे जायचें बंद केलें आणि त्यांच्या 'ही–' गोष्टीवर बोलताना मुग्धता स्वीकारली! इतकेंच नव्हे तर मी ताईच्यापासून दूर राहूं लागलों. याचें कारण फार गहन आहे. ताई ज्या वेळीं इथ नोकरी करीत होत्या त्याच वेळीं माझी आतेबहीणही त्याच शाळेत नोकरी करीत होती. दोघींचा स्नेह अगदीं दाट झाला. आणि माझीही ओळख व्हायला माझी आतेबहीण काशीच कारणीभूत झाली! बिचारी काशी! ती एका तरुण गृहस्थाच्या प्रेमात गवसली आणि फसली. आपली ही दैन्यावस्था तिनें आक्रंदून ताईला सांगितली आणि मदतीची अपेक्षा केली. पण ताई स्नेहाला जागल्या नाहींत. दूर कोठेंतरी जाऊन ऑपरेशन करून येण्यासाठीं एक कपर्दिका देण्याचें त्यानी नाकारलें! इतकेंच नव्हे तर काशीच्या संबंधाला तोडून तिला शाळेतून अनैतिक वर्तनाबद्दल घालवून देण्याचा घाट घातला. मग, अमृत! ती कोमेजलेली काशी ह्या जगांतून नाहींशी झाली.! माझें मन मोडून गेलें आहे हें लिहितांना पण काय करूं? खरंच मी अकालीं मातृपदाचा कैवारी नाहीं पण त्या अभागी स्त्रीला मी त्याज्य ठरवणार नाहीं. प्रेम कुणावरही बसूं शकेल आणि निसर्गतःच कोमल अंतःकरणाच्या स्त्रीला प्रेमाची तहान फार लागते! खरंच तसेंच प्रेम तुझ्या ताईचें विश्वनाथ संत्रीकरवर बसलें! त्यानें बिचाऱ्यानें ताईना फसवलें नाहीं अं मात्र! तो लग्नाला तयार होता पण ताईचें कुठें बिनसलें कुणाला ठाऊक! ताईना त्याच्यापासून दिवस गेले नंतर पुण्याची नोकरी सोडून ताई मुंबईस गेल्या पण त्याना तिथें नोकरी मिळालीच नाही! एकदोन ठिकाणीं त्याना अपमानकारक बोलणी ऐकावी लागली. तशात चिडक्या मनःस्थितींत त्यांचा अन् विश्वनाथचा खटका उडाला! मग काय ताईना तो बधणार? पण ताईना स्वतःची असहाय्यता जाणवली. आणि एका रात्रीं कुलाब्याच्या कट्ट्यावरून ताईनीं स्वतःचा देह टाकला. त्याच वेळीं माझे मोठे भाऊ शिवराम सहज फिरायला म्हणून आले होते.

त्या ठिकाणीं त्यांना कसलीतरी शंका येऊन त्यानीं किनाऱ्यावर तपास केला आणि त्याना ताईचें शव पहाटे साडेपाच वाजतां हाताला लागलें! किती भयकर प्रसग होता तो! पण शिवरामानें मदतीच्या अन् पैशाच्या साहाय्यानें तें प्रकरण मिटवून टाकलें. ताईच्या कनवटीला एक जाडसें पाकीट लागलें! सभ्यतेला सोडून तें त्यानें वाचलें आणि बाबाच्याकडे रवाना केलें! अमृत, त्या काशीवर 'ही—' मनोविश्लेषणात्मक कथा लिहिली आणि तीच सर्वोत्कृष्ट ठरली! अमृत, पाहिलेंस हें स्त्रीहृदय! कोमल जीवाचा तळतळाट घेऊन ताईनीं स्वतःला कीर्तिशिखरावर नेलं तें पाहून तुला नाहीं वाईट वाटलं? ताईविषयी तुझा आदर कमी न व्हावा म्हणून मी मुग्धता स्वीकारली होती पण आता तुला सांगणें क्रमप्राप्तच आहे!! भावना ह्या कांहीं यंत्र नव्हेत, कीं कळ दाबल्यावर त्यांची उर्मी दडपून जाईल! अमृत, ज्या जगानें ताईना स्त्री–हृदयाची विदारक दृश्यें रगविणाऱ्या म्हणून रंगवलें त्याच का आपल्या ताई? मला त्याच्याबद्दल आता कींव वाटतें! खरंच रागावू नकोस अं अमृत! त्याच्या हृदयाचे निनादही पोकळच होते! भाषेच्या अन् लालित्याच्या फसव्या आभरणाखालीं त्यानीं एका श्रांत कुसुमाला चिरडलें खरें. पण......

काशी अन् ताई ह्या दोघींही सारख्याच! पण जगाला काय दिसतं बरं?

साऱ्या स्त्रिया अन् पुरुष हीं भावनेच्या धुक्यांत दडलेली जातीपुष्पं आहेत! प्रकाश मिळेल तें पुष्प वायुलहरींवर हंसेल पण तेंसुद्धां किती मंदतेनें असो. अमृत, शशीच्या प्रकाशाला अमृताची उपमा देतात हें आहे ना माहीत तुला? एवढीच उपमा लक्षांत ठेवून ह्या दुरावलेल्या शशीकडे पहा!"

तुझा,

—शशी

  

अमृतनें तें पत्र बंद करून बाजूला पाहिलें, टेबलावर ताईचें पुस्तक फडफडत होतें! जणू काय त्या निर्जीव पृष्ठांना देखील तसलें लालित्य नको म्हणून भाषेची विचार-पुष्पं निखळून जाण्यासाठीं आपलें अंतरंगच तीं पानें हलवीत होतीं!

—चंद्रकुमार डांगे.

(धनुर्धारी १४ मे १९३८)

---

# त्रिवेणीसंगम : ७

नाशिक.
५-८-३८

**प्रिय पुष्पा,**

तुला पत्र पाठवावं असं कितीतरी वेळां माझ्या मनांत आलं. पण छोटा अरुण काहीं स्वस्थच बसूं देत नसे मुळीं. सारख्या त्याच्या खोडया चालतात ना ? आणि मी त्याच्यावर रागावलें कीं एकदम घुस्सा होतो माझ्यावर इकडचा. मी तरी काय करूं ग ? अगदीं भंडावून सोडलं आहे या गुलामानं. बाकी तुझं ठीक आहे म्हणा! तुला काहीं अनुभव नाहीं याचा ! दुरून दुरून अरून्न कौतुक करायला काय होतय् तुला. मला अगदीं बोलतेस नाहीं कां नेहमीं मी त्याच्यावर डोळे वटारतें म्हणून ? पाहू आता तूं काय करणार आहेस तें ?

हो—! विसरलेंच. मी तुला अगदीं नाजूक अशा प्रश्नाबद्दल थोडसं विचारणार आहे. त्यासाठींच तर वेळांत वेळ काढून,

अरूला दुसगीकडे नादीं लावून मी लिहायला बसलें. पण मधेंच त्याचं पुराण सुरूं झालं. अगदीं अस्सं होतं माझं नेहमीं.

पुष्पा, तू आणि मी अगदीं लहानपणापासून जवळ जवळ वाढलों, खेळलों, भांडलों आणि पुन्हा एकत्र झालो. तुला आठवतात का आपल्या घरामागच्या बागेत आपण घेतलेल्या आणाशपथा ? आपण एकमेकींना कधींहि सोडून जाणार नाहीं म्हणून आपण रोज किती वचन दिलीं बर एकमेकींना ? मी सासरीं यायला निघालें तेव्हा तुझ्या डोळ्याचं पाणी कांहीं खळल नाहीं. पुष्पा ते दिवस गेले नाहीं कां ग ? आतां पुन्हा कसे येतील ते.

ज्यावेळीं गत आयुष्याचा चित्रपट माझ्या डोळ्यासमोर येतो त्या वेळीं कितीतरी स्मृतींचं इन्द्रधनु माझ्यासमोर दिसू लागत. त्याच्या तेजस्वी आणि रंगीत कणाकणात तुझ्या माझ्या सहवासाचीं रम्य, उदात्त नि प्रेमळ चित्रं रेखाटलीं गेललीं मला दिसतात. पुष्पा, आता आपली भेट होण मोठ अवघड झालं आहे नाहीं ? इकडून मला नेहमीं म्हणणं होतं " तुला पुष्पा, मी अन् अरूण याच्या शिवाय चवथं कुणी ठाऊकच नाहीं, म्हणून." हो! आहेत तर काय झालं भाराभार माणसें मला माहीत. पण मला काय करायचं आहे त्याच्याशीं ?

पुष्पा, माझ्यापासून तूं आतांपर्यंत एकही गोष्ट लपवून ठेवली नाहींस. पण आतां मात्र कांहीं कांहीं गोष्टी माझ्यापासून चोरून ठेवतेस काय ? पण मला साऱ्या कळतात बरं का त्या. काय ग ? तूं इतकी आजारी होतीस, तुझ्या पोटावर शस्त्रक्रिया झाली...कळवलस कां एक अक्षर तरी मला ? तुझ्या शेजारच्या इन्दूनं सांगितल मला हें. अशी रागावलें आहे मी तुझ्यावर ! मी तुझी कुणीच नाही वाटतं ?

आणि पुष्पा, श्रीकान्तानीं दुसरं लग्न पण करायचं ठरवलंय् म्हणे. खरी आहे का ही गोष्ट ? तुझ्यावरचं त्याचं प्रेम पाहून सगळ्याना कसा अचंबा वाटत असे. आणि त्यांनीं कसं ग लग्न ठरवलं दुसऱ्या मुलींशीं ? मानसशास्त्राच्या आधारें अत्यंत उत्कृष्ट कादंबऱ्या आणि लघुकथा लिहून महाराष्ट्रांत प्रसिद्धीला आलेले

हे वडे साहित्यिक आपल्या प्रेमळ पत्नीची भावना विसरले वाटतं? साऱ्या वर्तमानपत्रांनींसुद्धा जहाल टीका केली आहे त्यांच्यावर!

पुष्पा, तू कांहीं म्हण. मला अगदीं रहावत नाहीं त्याना दोष दिल्यावांचून. असलं कसलं ग बेगडी आणि पाशवी प्रेम! मला तर पुरुषी अरेरावीचा आणि चंचलपणाचा हा कळसच वाटतो. आणि इतकी गंभीर गोष्ट असूनसुद्धा मला तू कळविली नाहींस ना? पुष्पा, मी अधीर झालें आहे तुझं उत्तर ऐकण्यासाठीं. माझं पत्र वाचून झाल्यावरोबर तावडतोब मला सविस्तर पत्र पाठव.

रागावू नकोस हं श्रीकान्तांच्याबद्दल दोन शब्द कडक लिहिल्याबद्दल.

आशिर्वाद लिहूं तरी कुणाला!

तुझीच

मालूताई.

---

पुणें.

प्रिय मालू, ७-८-३८

अशक्तपणानं मला कांहींही करवत नाहीं. तरी सुद्धा तुझ्या अधीर पत्राला उत्तर देण्यासाठीं मला लिहायला बसावं लागलं.

तुझं पत्र मीं किती तरी वेळां वाचलं. मला वाटलंच असं कांहीं तरी होणार म्हणून. मी तुला कळविणारच होते दोनचार दिवसांत साऱ्या गोष्टी. पण तुझें पत्र अगोदरच पोंचलं मला.

श्रीकांत दुसरं लग्न करणार आहेत म्हणून इन्दूनं सांगितलं ना तुला? पण मी सांगतें त्यांचं लग्न झालं सुद्धा आपल्या सुशिलेबरोबर!

मला ठाऊक आहे तुला आश्चर्याचा मोठा धक्का बसेल हें ऐकून. पण सगळं पत्र वाचून झाल्यावर तुला कळेल सारं कांहीं.

माझ्या पोटावर शस्त्रक्रिया होऊन महिना झाला. तुला माहीतच आहे लहानपणापासूनच मला पोटाची व्यथा आहे ती. अलीकडे अलीकडे मला फारच त्रास होऊं लागला. आणि साऱ्या डॉक्टरांचं मत पडलं कीं मी जगावी असं वाटत असेल तर माझं गर्भाशय

काढून टाकलं पाहिजे. मी नको नको म्हणत असतांना कान्तांच्या आग्रहामुळें मला शस्त्रक्रिया करवून घ्यावी लागली.

मालू, कान्तानीं आणि मी कॉलेजमध्यें असल्यापासून भावी जीवनाचीं कितीतरी रम्य रम्य चित्रं रेखाटलीं होतीं! पण आतां काय त्याचं? हवेंतले किल्ले हवेंतच विरून गेले, वाळूंतले मनोरे ढासळून पडले आणि आमच्या प्रेमाच्या वेलीवर फुलणारीं फुलं जन्माआधींच वाळून कोळ झालीं.

तुला माहीत आहे ना कान्ताना लहान लहान मुलांचा किती नाद आहे तो? लहान मुलांचीं अंतःकरण असतात आकाशांतल्या ताऱ्यांसारखीं निर्मळ आणि त्याच जीवन गंगेच्या प्रवाहासारखं शुद्ध. मुलं आणि वेलीवरचीं फुलं अगदीं सारखींच असतात. लहान मुलाच्या सहवासात घालविलेला वेळ आणि देवाच्या मंदिरांत घालविलेला काल अगदीं सारखाच असतो. कितीहि वेळां जाई-जुईच्या सुगंधाचा आस्वाद घेतला तरी त्यांतली अवीट गोडी कांहीं कमी होत नाहीं. तशीच स्थिति आहे या मुलांच्या सहवासातली. पण आम्हाला त्याचा काय उपयोग?

माझ्यावर शस्त्रक्रिया झाल्यापासून कान्त जे बदलले ते बदलले. आठ दिवसात त्यांचा चेहरा सहा महिन्यांच्या आजाऱ्यासारखा दिसायला लागला. सुशिला हल्लीं इथेंच असते कॉलेजात. ती माझ्या शुश्रूषेला रोज येत असे. तिनं आणि मीं पुष्कळ विचार केला ह्या गोष्टीचा. शेवटीं मला त्याच्या दुःखाचं कारण कळलं.

सुशिलेला एका बाजूला बोलावून मीं सगळं कांहीं सांगितलं, आणि कान्तांसाठीं तिच्या सर्वस्वाची भिक्षा मागितली मीं! मालू, सुशिला उदार आहे, प्रेमळ आहे, देवता आहे. ती माझीं सवत व्हायला कबूल झाली. माझी सुशिला आहेच तशी माझ्यासाठीं वाटेल तें करणारी आणि माझे कान्त पण आहेतच तसे कुणालाहि आपल्याकडे ओढून घेणारे.

त्या दिवशीं मी आणि कान्त दोघेंच घरांत होतों. रुग्णालयांतून घरीं येऊन मला एकदोनच दिवस झाले होते.

' कान्त, ' मी म्हटलं ' तुम्हाला एक विचारू कां ? ' ' विचार ना तुला काय विचारायचं असेल तें. आजच का अस विचारतेस मला ! ' कान्त म्हणाले.

आणि मी त्याना लग्नाबद्दल विचारलं—

एकाद्या उंच पर्वताच्या शिखरावरून खालीं ढकलून दिल्या-सारखी त्यांची स्थिती झाली. ' पुष्पा ' घोगऱ्या आवाजात तें म्हणाले ' माझं हृदय अजून सुद्धां ओळखल नाहींस तूं ? पुष्पा, ध्रुवासारख अढळ आहे माझं प्रेम ! हृदयाच्या मंदिरात स्थापन केलेल्या या देवतेच्या मूर्तीला लाथाडून टाकून दुसऱ्या कुठल्या तरी मूर्तीची मी निव्वळ वासना तृप्तीसाठीं स्थापना करूं होय ? आकाशातल्या पक्षासारखे आपण खेळलों बागडलो. प्रेमाच्या, आपलेपणाच्या आणि स्नेहाच्या विशाल आकाशात आपण स्वच्छं-दानं विहार केला. इवल्याशा शिडाच्या प्रेमनौकेंत बसून जीविताचा सागर ओलांडायला सुरवात केली आणि ध्येयाचा किनारा दिसूं लागला न लागला तोंच वल्ह्यावरची तुझी पकड ढिली झाली म्हणून क्रूर नक्राच्या भक्ष्यस्थानीं पडण्यासाठीं तुला खाली ढकलून देऊं होय ? पुष्पा, तू ओळखल नाहींस मला अजून !! ... ... ... '
असं कितीतरी वेळ ते बोलत होते. त्याचा कंठ दाटून आला होता. त्यांनीं मला हृदयाशीं घट्ट, अगदीं घट्ट धरून ठेवलं होतं. त्याच्या मिटलेल्या पापण्यातून गळणारे आसवाचे थेंबच्या थेंब माझ्या मस्तकावर पडत होते; त्याच्या हृदयाची धडधड् मला स्पष्टपणे ऐकूं येत होती. आमच्या तोंडातून शब्द फुटत नव्हता. किती अरुवार आहे ग त्यांचं हृदय !

' पुष्पा, मला पुन्हा असं विचारायचं नाहीं हं ! वाईट वाटेल मला. ' बऱ्याच वेळानंतर ते म्हणाले.

मी मात्र हतबुद्ध झालें. खरोखर त्यांच्यासारख्या थोर व्यक्तीनं माझ्यासारख्या यःकश्चित् स्त्रीकरता आपल्या आनंदाच्या मोठ्या वाटयाचा त्याग करावा हें योग्य आहे कां ?

त्यानतर त्यांना मीं कितीतरी वेळां निरनिराळ्या रीतीनं मांगून पाहिलं. पण काहीं उपयोग झाला नाहीं. सायंकालीन सूर्याच्या सोनेरी किरणात न्हाऊन निघणाऱ्या विस्तृत हिरव्यागार भूमिभागावरून हिंडताना आकाशींच्या निळ्या निळ्या फरशीवर विविध रगाच्या ढगानीं काढलेल्या गालिचाकडे पाहातांना, रात्रीच्या वेळीं अनंत दीपज्योतींच्या प्रकाशात आमच्या अंतःकरणांच्या लहानशा दीपिका घेऊन भावी जीवनाचा मार्ग चोखाळतांना, पक्षाची किलबिल ऐकताना, निर्झराच्या संगीतांत गुंगून जाताना व धबधब्याच्या गंभीर सदेशाचा अर्थ लावताना माझे कात आणि मी किती रंगून जात असूं. पण हा विषय आला कीं मात्र ते महाभारतातल्या यक्षासारखेच गभीर आणि मितभाषी होत.

मालू. भरतीच्या वेळीं समुद्राच्या लाटा आपण आपण आपल्या पायावर घेतोना ? ज्यावेळीं त्या परत जातात त्या वेळीं आपल्या पायाखालची वाळू खाली सरकते अन् मोठा खड्डा पडतो. जीविताच्या सागरात अशीच स्थिति होत नाहीं का माणसाची ? परिस्थितीच्या लाटांबरोबर आपल्या पायाखालची वाळू अशीच सरकत सरकत जात असते. आपल्याला भरभक्कम आधार कधीं मिळतच नाहीं मुळीं.

तसच झालं होत तेव्हा माझं ! मालू, आमच्या जीवितात आतां आनंदाची फुलबाग कधीच फुलणार नाहीं असं वाटल त्यावेळीं मला, आणि जखम धुण्याचं एक विषारी औषध शेजारी पडलं होतं त्याच्या कडे माझी नजर गेली. ' कांत, तुमच्या पुष्पाची शेवटची इच्छा म्हणून तुम्हीं सुशीलशी विवाह केलाच पाहिजे. ' येवढं एका चिठ्ठीवर लिहून मी तें औषध पिणार इतक्यांत कान्त तिथं आले.

माझ्या हातातला पेला एकदम उडवून देऊन त्यांनीं झट्कन् मला आपल्याजवळ ओढल आणि जवळची चिठ्ठी चटकन् वाचली. ' शेवटीं इतकी वेळ आलीना ? ' ते स्वतःशीं पुटपुटले, ' पुष्पा, माझ्या सुखासाठीं आत्महत्या करण्याची तुझी तयारी झाली ना ! मी जर इथं आलों नसतों तर मृत्यूच्या अग्नावर पडून माझं नाजूक फूल होरपळन गेलेलं मला दिसलं असतं. पष्पा. जगात लाखों अनाथ

अन् निराधार मुलं आज पायदळीं तुडवलीं जात आहेत त्यांतल्या एक दोघांना आपलीं मुलं मानलं तर नाहीं कां चालणार तुला ? '

' नाहीं ! आपल्याच जीवन रसातून निर्माण झालेलं फूल वेलीच्या कौतुकाचा विषय होतं. दुसऱ्या फुलझाडावरचं फूल तिच्या फांद्यावर आणून टाकलं तर स्रवेल कां तिच्या हृदयातून त्या फुलाला जीवन-सत्व देणारी अमृतधारा ? नाहीं. कान्त, तुम्हाला नाहीं कळायचं हें. माझ्या नाही तर नाहीं, पण तुमच्याच रक्तमांसापासून निर्माण झालेल्या सुशिलेच्या मुलाचा हळुवार स्पर्श मला पाहिजे आहे. तुम्हीं त्याचं कौतुक करावं, त्याला अंगाखांद्यावर नाचवावं, त्याच्या लीलांत मग्न व्हावं, त्याच्या बोबड्या बोलाला साथ द्यावी नि त्याच्या अमृतमय सहवासात सुखकर जीवन कंठावं असं मला वाटतं. मला नको आयत्या मंगळवारचं अन्न नि भिकेची शिदोरी. आपल्याच शेतावर तयार झालेलें कणसाचे दाणे मला शिजवायला पाहिजे आहेत—! "

भावनेच्या भरांत मी सारखी बोलत होतें. बोलतां बोलतां मी त्यांच्या अंगावर बेशुद्ध होऊन पडलें.

संपली माझी गोष्ट ! मधल्या बारीक हकीकती कशाला लिहू तुला ? तिजा भाव नाहींच मुळीं आमच्यांत !

सुशिला, कान्त आणि मीं एकच आहोंत बरं कां. आमच्या या तीन जीवितसरितांचा संगम असाच शांतपणानं, संथतेनं आणि आनंदानं अनंतसागराकडे वाहात जाईल. जगात अगदीं क्वचित्‌च आढळून येणारा त्रिवेणीसंगम आहे हा !

समजलं ना तुला सारं आतां ? नाहींना माझ्यावर कान्तांवर रागावणार पुन्हां ? तुझ्या अरूला घेऊन ये बरं का आमच्या इथे लवकरच.

पत्र फारच लांबलं. आतां चांगली बरी झाल्यावर लिहीन हं !

सदैव तुझीच

पुष्पा.

—श्री. शं. खानवेलकर बी. ए. ( ऑनर्स )

## टिक्‌टिक्‌ : ८

सकाळची आठसाडेआठची वेळ होती. 'चित्रा—विविधवृत्ता'ची ओरड अजून मधून मधून ऐकूं येत होती. मला अंथरूण सोडून पंधरा एक मिनिटें झालीं असतील. रस्त्याच्या खिडकींत आरसा ठेऊन त्याचेसमोर मी बसलो होतो. रविवारीं आरशापुढें आणखी कशासाठीं बसायचें ? डाव्याउजव्या हाताला सारें साहित्य पसरलें होतें. एकीकडे सेफ्टीरेझरचा दांडा, गंजलेल्या चारआठ ब्लेड्स्‌, लहानशी कात्री; तर दुसरीकडे साबणाचें झिजलेलें 'थोटूक' टक्कल पडलेल्या डोक्यासारखा दिसणारा झडून गेलेला तुरळक केसांचा ब्रश—आणखी काय राहिलं बरं ?—पाण्याचं भांड (हो, नाहींतर बिनपाण्याचीच व्हायची !) मांडीवर टॉवेल टाकला होता व ब्रशानं साबण लावण्याचा प्रयत्न करीत होतो. साबणाचा फेंस ह्या कानापासून त्या कानापर्यंत—तसाच वरच्या ओंठावरही पसरला होता. साबणानं फेंसाळलेला चेहरा फार गंमतशीर दिसतो, नाहीं ?

समोर आरसा होता आणि चेहरा असा साबणानं लिंपलेला ! मग काय विचारतां ? तोंड वेडीवाकडीं करण्यात जो रंगून गेलों तों कशास काहीं पत्ता नाहीं. एकदा नगाऱ्यासारखे गाल फुगवायचे तर एकदा चबूतारख तोंड करून गाल आत ओढायचे. एकदां नाकपुडया रबरी फुग्यासारख्या हवेनं भरायच्या, तर एकदां डोळे 'ब्रह्मचारी'तल्या चडीगमामासारखे करण्याचा प्रयत्न करायचा ! असं करतां करता म्हशीसारखी लांब जीभ काढून वरच्या ओंठा-वरून ती नकळत फिरविली गेली तेव्हा ध्यानात आलं माझ्या कीं दाढीमाटीं आरशापुढें बसलोय् म्हणून ! तोपर्यंत साबणाचा फेंस सगळा वाळून गेला होता. माझा मीच आतापर्यंतच्या मूर्खपणाबद्दल स्वतःशीं मोठयांदा हसलो. माझं हंसणं संपलं, न् दारावर एक नाजूकशी टिक्टिक् मला ऐकूं आली. वाटलं, कदाचित् भास असेल, म्हणून गप्प राह्यलो. पण लगेच पुन्हा थोडया जोरात दारावर थाप आली.

'Yes, come in' म्हणालो न् शीळ फुंकीत गालावर ब्रश फिरवायला सुरुवात केली.

दार उघडल आणि उंबरठ्यावर एक व बाहेर एक पाय ठेवून उभी असलेली एक युवती दिसली मला. (घाबरूं नका; माझ्या ओळखीचीच होती ती) गुळगुळीत, मनाजोगी दाढी झाल्याशिवाय एखाद्या मुलीला आपलं अर्धवट साफसुफी झालेलं तोंड दाखवायचं ही गोष्ट काहीं मला प्रशस्त वाटेना. म्हणून मी म्हणालों—

"का, आज इतक्या सकाळींच कुणाकडे मोहीम ?"

"म्हणजे ? —नऊ वाजून गेलेत आता !"

"खरच कीं !" घडयाळाकड पहात, पण दाराकडे तोंड न वळवताच मी म्हणालों.

"सकाळचा उद्योग चाललाय् वाटतं"

"उद्योग म्हणजे–धंदा नाहीं काहीं माझा हा !"

"मग काय ?"

"'राष्ट्रकार्य' म्हण पाहिजे तर"

केवढयानं हंसली ती ! आणि त्या हंसण्याच्या शेवटीं माझ्या आरशासमोर एक टपोरा गुलाब पडला, आणि त्याच वेळीं दार लागल्याचा आवाज ऐकू आला.

" Vagabond Lover " मी ओरडलों—कारण मला एकदम खिडकीतून रस्त्यावरून वाजतगाजत जाणाऱ्या एका हिंदी ' अमर कलाकृति " बोलपटाची जाहिरात दिसली, त्या नावाची.

गेलीसुद्धा ! आणि मग मी चमकून गेलेल्या प्रसंगाच्या मागें मागें जात दारावर टिक्‌टिक् झाली तेथपर्यंत येऊन ठेपलों. खरंच, केवढी जादू होती त्यात ! दारावरच्या मृदु बोटाचा आवाजच ऐकायचा न् त्याबरोबरच निघणारा कामिनीचा कंकणरव कानात साठवायचा ! लवाजम्यासह निघालेल्या महाराणीचें आगमन पुकारण्यासाठीं पुढचा भालदार नाहीं का ललकारी देत ? पहाटेचा शुक्र नाहीं का पूर्वदिशा लवकरच उजळणार असल्याची ग्वाही देत ? तशीच ही कंकणरव मिश्रित दारावरची टिक्‌टिक्! ती दारावरच्या आवाजाबरोबरच अंत:करणाच्या गाभाऱ्यातही सूक्ष्मसे मृदु मधुर ध्वनि उमटविते.

एवढं वाचून तुमचा असा ग्रह होण्याचा संभव आहे कीं दारावरची ' टिक्‌टिक् ' म्हणजे काय मजा आहे ! आहे;—नाहीं असं नाहीं; पण असे प्रसंग फार थोडे. बाकी सगळे खडखडीत न् दडदडीतच. साहित्यात काव्य थोडं, गद्यच फार; पुण्यात हिराबाईचे जलसे क्वचित्, शनिवारवाड्यापुढच्या व्याख्यानाना मात्र ऊत, आमच्या गावच्या मंडईत रसरशीत फळे मोजकींच, माजलेल्या आळूचा मात्र सुळसुळाट! आयुष्याचेंही असेंच आहे. त्याला कोण काय करणार ? दार वाजलं म्हणून उघडाव तो नेमका नको असलेला चेहरा तिथ हजर असायचा. मग अगदीं नाईलाजानं " वा ! वा ! किती दिवसानीं उगवलात ! या कीं ' असें म्हणून बेगडी स्वागत करायचें, दात विचकायचे चार शब्द कसेबसे बोलायचे न् कोपरापासून नमस्कार करून परत घालवायचे; असेंच फार वेळा होतें. आणि मी म्हणतो येवढयानं भागलं तर ठीकच. त्याच्यामाग आणखी काहीं लचांड उरत नाहीं

झालं म्हणजे मिळवली. कुठें कुणी पोस्तच मागायला येतो तर कुणी मदत—वर्गणीसाठींच हात पुढें करतो. आणि एक एक वेळेला तर कधीही दाराशीं न येणारे आसामी लांबलचक वेळ खाऊन टाकतात आपला न् अखेर जातांना समोर दिसेल तें पुस्तक ('निवड' वगैरेची भानगड नसते त्याच्याकडे!) परत न आणून देण्यासाठींच, मागून नेतात. एकदा तर या दारावरच्या टिकटिकीनं मला चांगलंच आकाबाईच्या फेऱ्यांत ओढलं होतं. सांगतो तुम्हांला म्हणजे समजेल केव्हाकेव्हा ती कशी जीवखाऊ असते, तें.

डिसेंबरचा मध्य होता. थंडी मी म्हणत होती अगदीं. सकाळचे साडेसात झाले असतील. इतक्या लवकर त्या दिवशीं कसा उठलो होतो कोण जाणें. माझ्या खोलीचीं दारं—आणि खिडक्या पण बंद होत्या साऱ्या. आणि 'गोल्डफ्लेक'च्या सुखकारक झुरक्याचें आस्वाद घेण्यांत मी मग्न झालो होतो. नसनसातून उष्णतेच्या पिचकाऱ्या मारल्यासारखे वाटत होतें. खोलीभर धूम्रवलयें पिंगा घालीत होती. इतक्यांत मी दारावर थाप ऐकली. दाराशीं कोण आलं आहे असं मला वाटलं असेल याची कल्पना येते का तुम्हांला? 'शेजारच्या खोलींतला मित्र?'—हो, शक्य आहे. 'दूधवाला गवळी?'—हो त्याचीही वेळच होती. 'पोस्टमन?'—कदाचित् असेलही. अंगाभोंवतीं लपेटलेल्या पांघरुणांना दूर लोटून दार उघडायला गेलो व दार उघडलें. पाहातों तों—दारांत वडील उभे! तेव्हां मात्र माझी गाळणच उडाली. किंकर्तव्यमूढच झालो म्हणाना. तरी प्रसंगावधान राखून तोंडातला धूर तसाच गळ्याखाली लोटला —केवढे श्रम पडले हें करायला याची तुम्हाला कल्पना नाहीं यायची—आणि जळती सिगारेट पाठीमागे नेऊन चुरगळून टाकली. दुसऱ्या हातानें वडिलांच्या हातांतली बॅग खोलींत ठेवली. मुंबईला जायचं अचानक ठरल्यामुळें वाटेंत पुण्याला उतरायचा बेत वडिलांनीं, आधीं पत्रानं न कळवतां, केल्यानें घोटाळा झाला इतका. यापुढची हकीकत सांगायची जरूरी आहे असें मला वाटत नाहीं. एवढं मात्र सांगतो कीं, अजून जेव्हां जेव्हां दारावर थाप एकूं येते तेव्हां माझे

लक्ष नकळत आधीं तळहाताकडे जातें. कारण तिथें एक लहानसा भाजलेला डाग—'जलती निशानी' आहे.

दार उघडल्यानंतर असे प्रकार केव्हां केव्हां होतात. पण नुसत्या दार वाजवण्यानेंच डोकें फिरवणारे प्राणी असतात. शांतपणें वाचीत–लिहीत बसावं न् एकदम धाडधाड आवाज व्हायला लागतो. वाटतं कीं, जीविताचं रक्षण–अभयदान मागायला तर कुणी शरणागत लोटांगणं घालीत दाराशीं आला नाहीं! किंवा दिवसा ढवळ्या घरफोडी करायला तर कुणी दरोडेखोर निघाला नाहीं! दुसऱ्याच्या दाराशीं यायचें न् असा ठणाणा सुरू करायचा याला काय म्हणावें तेंच समजत नाहीं. माझा एक मित्र आहे—असाच विक्षिप्त. एके दिवशीं रात्रीं दारावरच्या बेसुमार बडवण्यानें जागा झालों. दिवा लावून पहातो, तों साडेबारा होऊन गेलेले. डोळे चोळीत दार उघडलं तर आमचे मित्रवर्य नुकतेच सिनेमाहून येऊन लवकर झोंप येण्यासाठीं कांहींतरी वाचायला हवें म्हणून कांही मासिक आहे कां, याची विचारणा करीत होते. 'कांहींतरी वाचीत पडल्याशिवाय झोंपच येत नाहीं मला' तो म्हणाला. मी रागानं लाल झालों होतो. स्वतःला चांगली झोप यावी म्हणून दुसऱ्याच्या झोंपेचें खोबरें करीत निघालेला शिष्ट हा! धाडकन् दार लावून घेतलें व दिवा काढून पुन्हां अंथरुणावर येऊन पडलो. जिन्यावर त्याचीं पावल वाजलेलीं ऐकलीं न् झोपी गेलों—सकाळीं जागा झालो तो पुन्हा दार ठोठावण्यानेंच. थोडासा चिडूनच उठलो. पण दार उघडल्याबरोबर पोस्टमन् दृष्टीस पडताच सगळा नूरच पालटला आमचा. कितीतरी दिवसानीं त्याने कमाताइचं पत्र माझ्या हातीं दिलं होतं आणि त्यांतल्यात्यांत पन्नास रुपयाची मनीऑर्डर होती त्या दिवशीं. मग तर त्याच्या स्वागताला पारावार उरला नाहीं. वाटलें कीं, रात्रींचें दार ठोठावणें कोणीकडे व आतांचें कोणीकडे! झटपट तोंड धुणें वगैरे करून समोरच्या 'पेशवाई उपहारगृहांत' चहा-बरोबरच दैनिकातल्या राशीभविष्याची लज्जत उपभोगायला गेलो.

आणि त्या दिवशीं मला तिथें नक्की सांगडलेच (कारण नेहमीं अशापैकींच काहींतरी असायचें!)—'धनलाभ, प्रकृतीस स्वास्थ'

दारावरची टिक्‌टिक् ऐकण्यापेक्षाहीं, मला वाटतें, दुसऱ्याच्या दारावर जाऊन टिक्‌टिक् करण्यात अधिक मौज असते. दार वाजवायचें न् लगेच जिना उतरून पसार व्हायचें, किंवा 'मी आता तुमच्याकडे येऊन गेलो काय?' अशी एखादी चिट्ठी ठेवून बेपत्ता व्हायचें; कडीशी चाळा करायचा न् हलकेंच बाहेरून ती लावून घ्यायची, आणि अशा तऱ्हेनं आतल्या व्यक्तीची गंमत करायची. आपण जेव्हां दुसऱ्याच्या दाराशीं जातो तेव्हा असेंच वाटत असतें कीं दार उघडणाऱ्यानं आपलं मनापासून स्वागत करावं. नाहींतर विरस होतो आपला. सुतकी चेहेरा न् आंबट डोळे यानीं दार उघडलं कीं आपला मनोभंग होतो आणि दार उघडल्यानंतर तिरस्कारानं संभावना झाली म्हणजे तर दारुण वेदना होतात अंतःकरणाला. ह्यूगोच्या Les Miserables कादंबरींतील नायकानें आयुष्याचीं वीस वर्षं तुरुंगात काढून बाहेरच्या जगांत पुन्हां पाऊल टाकलें, तेव्हा प्रत्येक दारानं त्याला ठोकरींनंच उडवून दिलं, आणि प्रत्येक खिडकी तो समोर दिसला कीं आपल्या पापण्या मिटून घेत असे. वाट चालून दमलेला तो व्हालजिआं संध्याकाळचे वेळीं एका खेड्यातल्या तुरुंगापाशीं आला आणि त्यानं दारावरच्या शिपायाला मोठ्या आदबीनं विचारलं, 'एक रात्र काढण्याची सोय होईल कां?' तेव्हा त्याला पोलिशी बाण्याचं उत्तर आलं कीं, 'तुरुंग म्हणजे काय खाणावळ वाटली तुला? चोरी करून हात कड्या घालून ये म्हणजे दार उघडतो' त्या श्रांतशरीर जीवाला केवढा चरका बसला असेल या शब्दांनीं! रात्र हळुहळु वाढतच चालली. गावांतलीं पोरेंसोरें वेड्याच्या पाठीस लागल्याप्रमाणें करून त्याला खडे मारीत होतीं. रस्त्यानें जाणारा येणारा त्याच्याकडे शंकागर्भ दृष्टीनें निरखून पहात होता. तो तसाच एका शेतकऱ्याच्या खोपटापाशीं आला आणि त्यानं दार वाजवलं—त्यासरशीं दार उघडलें, व तो म्हणाला, 'For mercy's sake, a glass of water'.

त्याचा हीनदीन अवतार, वाढलेली दाढी, हालअपेष्टांनीं झालेली क्रूर-भीषण मुद्रा, तीन्ही साजची वेळ, हें सगळें लक्षांत घेऊन शतकऱ्यानें उत्तर दिलें, 'A charge of shot !' तिथून तो पुढें सरकला. रस्त्याच्या कडेला एक कुत्रा गव्हाणींत शिरताना त्यानं पाहिला. आणि त्याच्या तोंडातून कारुण्यपूर्ण उद्गार बाहेर पडले.—'I am not even a dog.' जगाच्या दाराशीं सहानुभूतीच्या अपेक्षेनं लाचारी पत्करून गेलेल्या पतिताची आजवर अशीच विटंबना झाली आहे !

जगात येणारा प्रत्येक प्राणी आपलं जगानं हंसत मुखानं स्वागत करावं, आपल्याला डोक्यावर घेऊन नाचावं, आपल्या सुखासाठी तत्पर असावं आणि अखेर आपलं वास्तव्य सफल म्हणजे प्रेमानं, हंसत मुखानं निरोप द्यावा अशा अपेक्षेनच जगाच्या दारावर टिक्टिक् करीत असतो. जन्ममरणाचे प्रवास करकरून श्रांत झालेला पाथस्थ जगाच्या दाराशीं ठोठावतो तेव्हा त्याची हीच मनीषा असते कीं, जगानं आपल्यासाठीं विलंब न करता दार उघडावं आणि चार दिवस सुखानं राहू द्यावं. उमरखय्यामनं हेंच एका रुबायांत गायिलं आहे.—

> And as the Cock crew, those who stood before
> The Tavern shouted—" open the door
> You know how little we have to stay,
> And once departed may return no more "

—त्र्यं. वि. सरदेशमुख



# एकाङ्गी प्रेम : : १

एका प्रसिद्ध महाराष्ट्रीयन् लेखकाची अभिनव लघुकथा ! आणि तीहि ' किर्लोस्करच्या ' दिवाळी अंकांत आलेली ! कोणत्या रसिक वाचकाचें चित्त आकर्षून घेणार नाहीं ? सुहृदेच्या तरुण मनावर तिचा विशेषच परिणाम झाला. लघुकथेंतील नायकानें नायिकेची केलेली मनधरणी, (बहुतेक लघुकथांतून नायकच नायिकेची मनधरणी करीत असतो!) तिनें त्याचा केलेला अव्हेर (हा अव्हेरहि ठरलेलाच!) आणि त्यामुळें त्याच्या व्याकुळ झालेल्या (अर्थात् नेहमींप्रमाणेच!) चित्तवृत्तीचे निश्वास—सर्वच तिला अगम्य वाटले. आणि नायिकेने नायकास झिडकारलेलें पाहून तिला थोडासा विषादहि वाटला. कारण गोष्टींतील नायक कोणासहि तरुणीनें अगदीं डोळे झाकून त्याच्यावर प्रेम करावें असाच होता.

तिनें अंक टेबलावर टाकून दिला; आणि आराम खुर्चीवर अंग टाकलें. नंतर अंगास एकदोन आळोखेपिळोखे दिले व अर्धवट जांभई देत ' काहींतरी आहे झाल ' असे काहींतरी पुटपुटत ती

वाचलेल्या लघुकथेवर विचार करूं लागली. आणि सहजच तिच्या मनांत विचार आला—' मी जर नायिका असते तर ?—पण अद्याप तरी मला ते भाग्य लाभलें नाहीं. कारण मी अगदीच अरसिक पडले ना ! तरुण असून म्हातारी !... '

इतक्यात तिच्या आईनें तिला चहा घेण्यासाठीं हांक मारली; आणि स्वताच्याच नादात विचार करीत–करीतच ती जिना उतरून खाली गेलीहि ! विचारांच्या भरात कपाटांतून कप काढीत असतानां बशी खाली पडून फुटली; त्या आवाजानें ती भानावर आली.

दुसरे दिवशीं सुद्धदा विशेषच उल्हासानें कॉलेजांत गेली. व्हरांड्यांतच तिला उल्हास मित्रांशीं बोलत उभा असलेला दिसला. त्याची ती भव्य शरीरयष्टी, प्रसन्न मुद्रा, भुरभुरणारे केस आणि गालातल्या गालात हंसणें–तिला त्यावेळीं लघुकथेंतील नायकच भासला तो ! त्याच्याकडे एकदोन वेळां मागे वळून पाहात पाहात ती निघून गेली. तिची त्याची नुकतीच तोंडओळख झाली होती; तरीहि मधल्या सुटींत त्याला मुद्दाम गांठून तिनें विचारलें—

' उल्हास, कसल्या गप्पा चालल्या होत्या मघाशीं–जोरजोरांत ? '

' मुलींच्या विषयींच्या ! हो, आम्हांस दुसरा विषय काय असणार ? ' त्यानें मिस्किलपणानें हांसत उत्तर दिलें.

' छे, भलताच अर्थ केलास तूं माझ्या बोलण्याचा; मी आपलें सहज विचारलें. बरं ते जाऊं दे. आज संध्याकाळी ' स्ट्रीट सिंगर'ला येशील कां ? '

' मला वेळ नाहीं '

पण ती अगदीच ऐकेना; म्हणून त्यास तिच्या बरोबर सिनेमास जाणें भाग पडलें. पण रस्त्यांत आणि सिनेमा थिएटरांतहि त्याला तिचें वागणें आवडलें नाहीं. तिच्या त्याच्याशीं वागण्यांत एकतऱ्हेची उच्छृंखल आपुलकी होती. तिच्या नेत्रांत त्याला नेहमींचें साध्या मैत्रीचे भाव दिसलें नाहींत–तेथें एकतऱ्हेची ओढ स्पष्ट दिसून येत होती.

आणि चित्रपटाचा अर्धा भाग संपल्यावर मध्यान्तरांत ती त्याला म्हणालीहि—

' आपल्याला एकमेकांबद्दल आपुलकी कां वाटते बरं ? '

' तुम्ही आपुलकी दाखवता म्हणून मीहि आपलेपणानें वागतो. तुम्हाला आपलेपणा कां वाटतो ते मी कसें सागणार ?'

यावर ती त्याच्याकडें तिरप्या नजरेनें पहात नुसती हंसली. त्याच्या शरीरात वीज चमकली; आणि हृदयात प्रकाश पडला. त्यानें समोर पडद्याकडे पाहिलें. आपले हृत्पटलहि तितकेंच स्वच्छ असावें असें त्याच्या ध्येयवादी मनास वाटलें. तथापि काय बोलावें हे त्यास सुचेना. आणि थिएटरातील फोनोग्राफची रेकार्ड ' प्रेम कोणीहि करेना'ची पुन्हा पुन्हा फिर्याद करीत असतानांच सिनेमा पुन्हा सुरू झाला.

थिएटरांतील गर्द अन्धकारांत मागच्या बाजूनें प्रकाशकिरणाचा ओघ वाहात होता—त्याच्या हृदयात नुसता अंधकारच भरून राहिला होता.

सिनेमा सुटल्यावर तिचें खुर्चीवर विसरलेले नोटबुक त्यानें न कळतच जातां जाता खिशांत घातलें.

ती दोघे परत येत असतानां तो अगदी स्तब्धच होता. ती काय बोलत होती याच्याकडें त्याचें अजिबात लक्षच नव्हतें. त्याच्या डोक्यांत विचाराचें भ्रमण चाललें होते—

आकाशात पौर्णिमेचा चंद्र बराच वर आला होता; पण त्यानें तिकडें पाहिलें नाहीं. पुलावरून जातानां नदीच्या पाण्यावरील तरंगलहरी चंद्रकिरणाशीं खेळ खेळत असलेल्या त्याला दिसूनहि न दिसल्या. दूर अंतरावरच्या गर्द झाडीकडें तो पहात होता—

काहीं वेळानें तिचें घर आल्यावर ' गुड नाईट ' करून ती निघून गेली; आणि तो खोलीवर परत आला. त्या दिवशीं रात्रीं त्याला—नीटशीं झोंप आली नाहीं. झोपण्यापूर्वी त्यानें रोजनिशींत लिहून ठेवलें होते मात्र—' आधीं कर्तव्य मग प्रेम !'

सकाळीं कोटाच्या खिशांतून फाउन्टनपेन काढीत असतानां त्याच्या हातास सुहृदेचें नोटबुक लागलें. त्यानें ते उघडून पाहिलें. दुसऱ्याच-पानावर पुढील मजकूर होता–

' उल्हास ' !—किती गोड नाव ! त्याच्याकडे माझें मन धाव घेतें— I like him, Really, I like him very much.

' एकंदरीत असे आहे तर ' तो विचार करूं लागला–' पण म्हणून माझें हिच्यावरच प्रेम असावें असे हिला कां वाटावे ?— माझ्या मैत्रीचा ही गैरफायदा तर नाहीं नां घेत ?...'

त्यानें नोटबुकाच्या पुढील पानावरच लिहिलें—

' You may like me, but I do not like you for reasons known to me alone.'

उल्हासनें दुपारी कॉलेजात सुहृदेचें नोटबुक तिला ' With thanks ' परत केलें. तिच्या भावनाना आपण जोराचा धक्का देत आहोत याची त्याला जाणीव होती; पण त्यास त्याचा इलाज नव्हता. त्याच्या मनात विचार आला ' तिनें तरी माझ्यासारख्या ध्येयवादी तरुणाची अपेक्षा कां करावी ? निर्गुण अशा रानवेलीनें शेजारच्या उमलत्या गुलाबाच्या ताटव्यावर झेप कां टाकावी ?— आणि मग त्याचे काटे बोचल्यावर त्याच्या कठोरपणास दोष कां द्यावा ! '

घरीं गेल्यावर सुहृदेनें आपलें नोटबुक उघडलें—आणि त्यांतील उल्हासनें लिहिलेल्या मजकुरांवर नजर जातांच आराम खुर्चीवर अंग टाकलें. तिच्या डोळ्यासमोर अंधेरी आली. तिनें चारपाच दिवसांपूर्वी वाचलेल्या लघुकथेंतील सर्व प्रसंग तिच्या डोळ्यासमोरून चित्रपटाप्रमाणें सरकलें. पण आतां पहात असलेल्या प्रसंगातील फ़रक म्हणजे नायिका नायकाची मनधरणी करत होती, आणि तो तिचा अव्हेर करीत होता. ते प्रसंग डोळ्यासमोरून जात असताना व्याकुळ झालेल्या नायिकेच्या चित्तवृत्तीचें निःश्वास सुहृदा अनुभवित

होती. नंतर ती एकदम उठली आणि टेबलावरील पेन घेऊन स्मरणवहींत पुढच्याच पानावर तिनें लिहून ठेवलं—

‘ लघुकथेंत नायिका नायकांना झिडकारतात–पण नायकानांहि नायिकांना झिडकारतां येत नाहीं असें नाहीं.’

—भालन् सापत्नेकर.

## हद्दपार : : १०

प्रेमा, एरवीं कधींच सकाळीं लौकर उठायची नाहीं. पण आदल्या दिवशीं रात्रींच तिनें वसुमती केळकरला आग्रहानें सांगितलं होतं सकाळीं लौकर उठवायला. वसुमती फार अभ्यासी असल्यामुळें ती, रेसिडेन्सीतसुद्धां लौकर उठत असे.

सहा वाजले नाहींत तोंच प्रेमा, नागनाथाच्या बंगल्याच्या फाटकाशीं हजर होती. तिनें बंगल्यासमोरच्या घड्याळात पाहिल, तर नुकतेच सहा वाजले होतें. मोगऱ्याच्या फुलाचा घमघमाट आणि वाऱ्याची थंडगार झुळूक, ह्यामुळे तिच मन आनंदित व्हायला हवं होतं. पण तिच्या गालावर चिंता आणि उत्सुकता ह्याची मिश्र छटा दिसत होती. सूर्याच्या कोंवळ्या किरणामुळें, तिच्या गोरेपणावर किंचितशी तांबडी छटा दिसत होती. हिरव्या जरीच्या पातळामुळें ती, जितकी आधिक सुदर दिसत होती, तितकीच तांबड्या छटेमुळें पग दिसत होती.

बंगल्याचं दार आंतून बंद होतं. प्रेमाने आपलं सर्व बळ एकवटून नागनाथाला हांक मारली. तिला आपल्या नाजूक आवाजाची कींव आली. तिच्या हाकेंला ' ओ ' देणारा गडी, तिला परमेश्वराप्रमाणें वाटला. गडी दार उघडत म्हणालाः–

" कोण प्रेमाताई ? या. चहा घ्या, कॉफी ध्या. रावसाहेब बसले आहेत खोलींत. आईसाहेबाना सांगतो, लाडू करंजी द्या म्हणून. "

' अरे पुरे रे तुझी बडबड. ' असं काहींस पुटपुटत ती आंत गेली.

उजव्या हाताच्या खोलींत नागनाथ दाढी करीत होता. एका खुंटीला एक काचेच कपाट टांगल होतं; आणि त्याच्यावर दाढीचं सामान पडलं होतं. सगळीकडे पोमेडचा वास पसरला होता. नागनाथानें नुकतेच मारलेले कट ह्यामुळे, आणि त्याच्या उजवीकडे झुकलेल्या भागामुळें, तो फारच सुंदर दिसत होता.

एका खिडकीच्या गजाला धरून, प्रेमा बाहेर पहात होती. इतक्यांत तिचं सहज नागनाथाकडे लक्ष गेल. त्याच्या गालावरून रक्त गळत होतं. ती घाबरून म्हणालीः—

' च् च् रक्त आलंय वाटतं. ह्या रुमालाला पुसून काढा. '

' नको रेशमी रुमाल कशाला तेवढयाकरितां ? अहो आम्हा तरुणाना दाढीकरिता तरी रक्त सांडू द्या. '

' नको काय ? धारच लागली आहे कीं, नळावरचं पाणी तरी आणूं का ? '

' नको ' म्हणून नागनाथानें तें, एका रुमालाला पुसून काढलं. रक्त थांबल्यावर प्रेमा म्हणाली.

' आठवण आहे ना आजची '

' हो, हो, हो. जशी काहीं तुम्हालांच काळजी आहे विवेकाची, आणि तो आमचा कोणीच नाहीं. '

' तसं कुठें म्हणतें आहे मी. पण म्हटलं म्हणजे लौकर आटपालं. '

' पण जेलरला भेटायला जायचं म्हणजे गालावर एक केस सुद्धां राहूं देता उपयोगी नाहीं. नाहीं तर जेलर तेवढाच उकरून काढायचा."

' इश्श, तुम्हांला आपलं वाटतं, पण मोठ्या लोकांचं इतकं लक्षच नसतं.'

' थोडया वेळानें, नागनाथानें शोफरला मोटर बाहेर काढायला सांगितलं. मोटार बाहेर उभी राहिल्याचा आवाज येताच, आपला पोशाख आरशात बघून, नागनाथ आपली सिगारेटची पेटी खिशांत टाकत बाहेर पडला. प्रेमा पण फळाची करडी बरोबर घ्यायला विसरली नाहीं. आणि गडयाची बडबड सुरू होण्यापूर्वीच मोटर भरकन् गेली. तुरुगाच्या भव्य पटांगणांत मोटर आल्याबरोबर, प्रेमाच्या मनात, विचाराची एकच गर्दी उडाली. आगगाडीच्या डब्यात गर्दी झाली तर साखळी ओढून गर्दी हटवता येते; पण विचाराची गर्दी कशी हटवणार ? नागनाथ आणि प्रेमा झटकन् खालीं उतरले. पुन्हा काहीं तरी विचार मनांत येऊन, नागनाथ प्रेमाजवळ येऊन म्हणाला:-

' तुम्ही इथेंच थांबा मी आत्तां जेलरला भेटून येतों.'

' लौकर या हं.' असं प्रेमा आतुरतेनें म्हणाली:-

प्रेमाच्या मनात विचारांची जितकी गर्दी झाली नसेल, तितकी आकाशांत ढगांची गर्दी झाली होती. पाऊस येणार म्हणून शिपाई आपले डगले सावरूं लागले होते.

थोडयाच वेळांत बुटांचा कर्कर् आवाज प्रेमाच्या कानीं आला. नागनाथाचं उतरलेलं तोंड पाहून प्रेमा गोंधळून गेली. भीड सोडून तिनें नागनाथाच्या खांद्यावर हात ठेवला. आणि ती म्हणाली:—

' काय आहे का परवानगी ?'

नागनाथ तिच्या गोऱ्या हनुवटीकडे बराच वेळ पाहिल्यानंतर म्हणाला,

' नाहीं बुवा. पण भीड खर्च केली तर कदाचित् होईल उपयोग.

असं म्हणून तो तिच्याकडे साशंक मुद्रेनें पहात राहिला.

खालीं मान घालून ती म्हणाली.

मग करा ना येवढं माझ्याकरिता. बघा, जन्मभर विसरणार नाहीं मी तुमचे उपकार. ' असं म्हणून तिनें नागनाथाला जवळ जवळ आंत ढकललंच. आपला कावा साधला असं मनाशीं म्हणत, तो नुसता आत जाऊन आला, आणि अर्ध्या तासाची परवानगी असल्याचें त्यानें तिला सांगितलं.

प्रेमाला, केव्हां एकदां विवेकला पाहीनसं झालं होतं. विरहानंतर प्रेमाच्या सागराला भयंकर भरती येते. आणि मग वेळेची मर्यादा त्यांत वाहून जाते. अनुभवून सुद्धा त्या स्थितीचा अर्थ कळत नाहीं; मग सांगून काय कळणार ?

प्रेमा निरनिराळ्या कैद्यांना पहात चालली होती. कैदी, सरकारचे कैदी खरे, पण पाचच मिनिटांत तिच्या सौन्दर्याचे कैदी झाले होते. तिला सर्वच कैद्याविषयीं आदर वाटूं लागला होता. ज्या कैद्यांनीं एकदां तिला पाहिलं, ते ती पुन्हा येईल म्हणून वाट पहात होते. असो. शेवटीं वॉर्डरनें तिला विवेकपाशीं नेऊन उभें केलें.

जाडयाभरडया खादीच्या वेषांत विवेकला पाहून प्रेमा चपापली.

ज्या विवेकाच्या अंगावर मऊमऊ रेशमी कपडयांनीं सुद्धां वळ उठायचे त्या विवेकाच्या हातापायांत आज बेडया पडल्या होत्या.

प्रेमाकडे हंसतमुखानें पहात विवेक म्हणाला.

' येवढी तसदी घ्यायची कांहीं जरूर नव्हती. '

' म्हणजे आपल्याला माझ्याविषयीं कांहींच वाटत नाहीं ना ? '

वाटतं पुष्कळ पण काय उपयोग ? ज्याला दगड फोडायचा आहे त्यानें दगडासारखं मन केलं पाहिजे. '

" अगबाई, म्हणजे दगड फोडायचे वाटतं ! '

' मग अंदमानासंबंधीं तुमची काय कल्पना आहे ? '

कुणीसं म्हटलं आहे ना कीं अंदमान म्हणजे नंदनवन आहे म्हणून. "

या उत्तरावर विवेक मनमोकळेपणानें हंसला.

' तुम्ही येऊन माझ्या मनाच्या समतोलपणाचा मात्र भंग केला हं. '

—म्हणजे पार विसरणार होतात तुम्ही मला ? नका, असं नका करूं. '

मी परत भेटेन असं का वाटतं तुम्हाला ? मग उगीच आशेचे पंख फडफडून कल्पनेच्या आकाशात भराऱ्या मारण्यांत काय अर्थ ?'

' पण हद्द म्हणजे देशाची, जगाची नव्हे ना ?'

' हं हद्द झाली तुमच्यापुढे ! अहो एकदां हद्दपार झालेला माणूस परत जिवंत परत येऊ शकतो कां कधीं ? आणि आम्ही जिवंत परत यावं म्हणून कां ही शिक्षा दिलेली असते आम्हाला ? '

विवेक म्हणता तरी काय तुम्ही ? तुम्ही मला कायमचे पारखे होणार ? '

' हो, अगदीं तस्संच. '

" मग मी येतें तुमच्या पाठोपाठ. '

' कुठें ? '

' जिथें तुम्ही जाल तिथें. '

' पण अपराध केल्याशिवाय शिक्षा देत नाहींत. '

' पुढें दगडावर वार करायचे, म्हणून आता हृदयावर वार करतां वाटतं ? '

' तसं नव्हे. पण मला वाटतं कीं, तुम्ही दुसऱ्या कुणाशीं तरीं विवाहबद्ध व्हावं. '

' कापडाचा रग विटतो, पण मन विटेपर्यंत मनाचा रंग विटत नाहीं. '

' पण रंग द्यायला जसं कापड लागतं. तसं प्रेम करायला माणूस लागतं ना ! '

' पण माणसाची आठवण असेपर्यंत प्रेम टिकतंच मुळीं. '

इतक्यांत वॉर्डरनें वेळ झाली म्हणून सांगितलं. एखाद्या आईच्या मांडीवरचा मेलेला एकुलता एक मुलगा उचलून न्यावा, त्याप्रमाणें प्रेमाची स्थिति झाली. जातांना तिनें फळाची करंडी विवेकाच्या

स्वाधीन केली; आणि ती नागनाथाच्या मोटारींत जाऊन बसली. थोड्याच वेळांत, नागनाथ आल्यावर शोफरनें मोटार कॉलेजच्या रेसिडेन्सीकडे काढली आणि प्रेमाला तिथें उतरवून, नागनाथ आपल्या बंगल्यावर गेला. प्रेमा जड पावलानीं आपल्या खोलीकडे गेली. सुमतीशी कांहीं एक न बोलता ती, पलंगावर आडवी झाली. आणि लौकरच तिला झोंप लागली. नंतर सुमतीनें अंगाला हात लावला तर प्रेमाला ताप आला होता थोडा.

त्या दिवसाच्या त्या तापाचं कारण तिला पुरलं; आणि ती मग कधींच संध्याकाळीं बाहेर पडली नाहीं. आणि आपली खिन्नता लपवायला तिला चागलच फावलं. येवढी तिच्या आवडीची 'प्रिंटेड 'पातळं, पण एकदा सुद्धा नेसली नव्हती ती त्या पधरा वीस दिवसांत, तिला प्रिंटेड पातळ फारच छान दिसायचीं. मुली सुद्धा चिडवायच्या. तसंच तिला साखरपाऱ्याच्या, आणि कोहळयाच्या वड्या फार आवडायच्या, म्हणून आईनें कुणाबरोबर तरी डबाभर पाठवल्या होत्या. पण तिनें एकीची चव देखील घेतली नव्हतीं. तेवढं सुदरसं रिस्टवॉच, पण किल्ली न देता, वेळेच्या ऐवजीं स्वतःचेंच बारा वाजल्याचें दाखवत पडलं होतं टेबलावर. सुमती आणि मैत्रिणी काहीं आग्रह करायला लागल्या म्हणजे, 'कससचं वाटतं' म्हणून ती म्हणत असे. असे दहा पधरा दिवस निघून गेले.

आज तिला नागनाथाचं बोलावणं आल्यामुळें, ती थोडीशीं बरी दिसत होती. मनाला आलेलें पातळ नेसून आणि गद्दींतल्या रद्दी चपला घालून ती बाहेर पडली. चालवत नव्हतंच. लगेच तिनें एक टागा उभा केला. आणि टिळकरोडवर चल म्हणून त्याला सांगत ती कशीबशी आंत बसली.

आपल्या दारापाशीं टांगा उभा राहिलेला पाहतांच नागनाथ आनदानें पुढें आला. प्रेमाला पाहताच चेहरा खिन्न करून तो म्हणाला. 'हं. या. आनद वाटावा असा कांहीं आजचा प्रसग नाहीं. आंत चला तुम्हाला सगळं सांगतों.'

नागनाथाच्या हाताचा आधार घेत प्रेमा खालीं उतरली. आणि टांगेवाल्याचे पैसे चुकते करून ती बंगल्यात गेली. प्रेमाचं हृदय धडधडत होतं. जवळच्याच आरामखुर्चीत तीनें अंग टाकलें. आणि नागनाथानें टेबलाच्या खणातून पत्र काढले. अंदमानाच्या सुपरिंटेंडेन्टच तें पत्र होत. पत्राचा मजकूर असा होता.

प्रिय नागनाथराव देशपांडे,

मला कळवायला अत्यंत वाईट वाटतें, आपले प्रिय मित्र विवेक सर्पदंशानें वारले. परमेश्वर त्याच्या आत्म्यांस शांति देवो ! हें वृत्त त्याच्या प्रेमाताई किंबे नावाच्या मैत्रिणींना कळवावें.

नागनाथानें तें पत्र प्रेमाला दिलें. तिचा हात थरथर कांपत होता. पत्र वाचून झाल्यावर ती बेशुद्ध पडली. नागनाथानें तिला कोचावर निजवलें; आणि तिच्या कपाळालावर थंड पाण्याची पट्टी ठेवली. थोडयाच वेळात ती जागी झाली. कळवळून ती म्हणाली, ' नागनाथ, आतां मला तुमच्याशिवाय कोण आहे हो ह्या जगात !' असं म्हणून तिने नागनाथाच्या गळ्याभोंवतीं हाताचा विळखा घातला. नागनाथाला पण डोळ्यात पाणी आणण भाग पडलं. प्रेमाच्या प्रीतीचा वेल पुन्हां नागनाथाच्या सहवासाने टवटवीत झाला. मधेच विवेकाच्या आठवणीनें त्याच्यावरची अर्धीमुर्धी फुलें गळून पडायचीं. पण कालांतरानें पुन्हा वेलाला टवटवी यायची. आणि विवेक ? त्याला खऱ्या सर्पाचा दंश झालाच नव्हता. पण नागनाथासारख्या विषारी नागामुळे तो प्रेमाला मेलेला होता. प्रेमाला अंतरला होता. आणि प्रेमा ? दोष कुणाचा ? प्रेमाचा, नागनाथाचा कीं परिस्थितीचा ? एका पुरुषावरचं प्रेम पालटून दुसऱ्यावर जडायला फार प्रयास पडतात, पण नागनाथानें तें एका खोटया पत्रावरून केल होतं. पत्र पाठविणारा तोच आणि वाचणारा पण तोच.

विवेकाला श्रम झाले, दगड फोडतांना जीव थकून गेला कीं, प्रेमाची आठवण होत असेल ! काम चुकलं आणि फटके बसायला लागले म्हणजे प्रेमाची उणीव भासत असेल. रात्रीचा गडद अंधार

पडला, हिंस्रपशूचं रडणंओरडणं कानीं आलं, डासांची गुणगुण आणि रातकिडयाची किरकिर झोपमोड करत असली, म्हणजे तसल्या अंधारात सुद्धां त्याला प्रेमाची प्रेममय मूर्ति दिसत असेल. आणि मग त्याला उद्याची आशा उत्पन्न होत असेल. पण शेवटीं आशेचे पंख फडफडून, कल्पनेच्या आकाशांत भराऱ्या मारणेंच बिचाऱ्याच्या नशिबीं. आणि प्रेमा ! मन न विटतां, मनाचा रंग मात्र विटून गेला.

—वि. त्र्यं. गर्दे, पुणें.

( चित्रमयजगत्–जुलै १९३६ )

## ‘ दिलरुबा ’ : ११

आज दुपारपासून आईची कोण धांदल उडाली होती! मोटारीचा हॉर्न ऐकूं आला कीं, घाईनें ओटीवर येऊन मोठ्या कुतूहलानें ती पहात होती, पण मोटार आली नाहीं असे पाहून लगेच ती आंत जाई आणि घड्याळाकडे पाहून ‘ ह्यात्तीच्या अजून चारच वाजताहेत का!’ असं स्वतःशींच पुटपुटत पुन्हां मोटारीचा हॉर्न कानावर येईपर्यंत शात असे. आता अनील नलिनी शाळेंतून येतील त्यांना कांहींतरी चागलं खायला करूं आणि मग बाकीच काम!

आज अनील पहिल्यानेंच शाळेंत गेला होता. नेहमी अनील घरीं असल्यामुळें आईचा वेळ कसा जाई हें तिला कळत नसे. पण आज तो घरीं नसल्यामुळें जिकडे तिकडे स्तब्धता पसरली होती. नाहीं म्हणायला मोटारीचा हॉर्न वाजल्यानंतर आई लगबगीनें ओटीवर जाई, तितकाच काय तो शांततेचा भंग होण्याचा क्षण!

आ तां पांच मिनिटं झाली होती. आईला वाटल आतां निघालीच असेल मोटार शाळेजवळून! ती अगदीं तडक गेटाजवळ जाऊन

उभी राहिली. दूरवर एकदा हॉर्न ऐकूं आला. आईचं कुतूहल इतकं वाढलं कीं बाळ मोटारीतून उतरतो केव्हां आणि त्याचा 'पापा' घेते केव्हां ! पण ती मोटार दुसऱ्या कोणाची तरी होती. आपण वाजले किती ते पहायला चुकलों नाहीं ना ? अशी शंका येऊन ती पुन्हा घरांत आली आणि इतक्यांत पोर्चमध्यें मोटार आली सुद्धा !

आईनें अनीलचा 'पापा' घेतला. जणू कांहीं सर्व विद्या संपादन करून बाळ घरीं परत आल्यांचा आनंद होता तिच्या तोंडावर झळकत. घरात आल्यावर आईनें अनीलची टोपी, कोट काढून होईपर्यंत नलीनें चहासुद्धा ठेवला स्टोव्हवर.

'आई ! आज मास्तरनी आपल्या अंगणात शेवंती आहे ना तिच गाणं शिकवल. किती छान आहे !'

'कुठलं रे अनील ?' नलीनें विचारलं.

'शेवंतीचं फूल माझ्या डोले अंगणीं, खेळें अंगणीं
डोल माझ्या बाहुलीचा पहा ग कोणी
डोळे कशी बटारते
गाल कशी फुगविते
राजाची राणी ... फूल माझ्या शेवंतीचें डोले अंगणीं.'

पाण्यात फूल टाकल्यावर जशी लहरींची सुंदर वर्तुळे पाण्यावर सुरू होतात आणि फूल हळुहळू डोलत असतं, तशी स्थिती आईच्या हृदयाची झाली होती.



बाहेर बॅंडचे सूर निघत होते. आईचा हात अनीलला शेवटचा घांस देतांना थरथर कांपत होता आणि मुजीच्या निमित्तानें अनीलला कितीतरी बक्षिसें मिळाली. अनीलच्या मामानें एक छानसा दिलरुब्याचा आहेर केला. अनीलने नलूताईला तो बक्षिसहि देऊन टाकला, आणि सोन्याचं घड्याळ हातावर बांधून तो जिकडे तिकडे मिरवीत होता.

नलिनीनें संगीतांत अगोदर बरीच तयारी केली होती, आणि आतां तर दिलरुबा घरीच होता. सहज येतां जातां धनुष्य घेऊन ती दिलरुब्यावर सहज हात फिरवी, आणि मंजुळ ध्वनींचा झरा वाहू लागायचा झुळझुळ ! दारावरून जाणाऱ्या लोकांचें एक पाऊल तरी अडखळल्याशिवाय रहात नसे.

*  *  *  *

आज रविवारची सुटी होती. नेहमीप्रमाणें नलिनीचा दिलरुब्याशीं खेळ चालला होता. अनीलनें मागून येऊन नलिनीच्या माने भोंवतीं हात ठेवून. ' नलुताई मी वाजवूं का जरा ?' असें म्हणून त्याने दिलरुबा घेतलासुद्धां तिच्या हातातून. नलिनी उठून खाली आईजवळ जाऊन बसली.

खुर्चीवर बसून अनीलची स्वारी ऐटींत दिलरुबा वाजविण्याच्या बेतांत होती, तोंच त्याला आठवण झाली कीं, नलुताई खुट्या पिळून नतर वाजविण्यास सुरवात करते. अनील खुट्या पिळू लागला आणि झंकार ध्वनी होऊन दोन तारा तुटून गेल्या. नलुताईला ह्या तुटक्या तारा दिसू नयेत म्हणून दिलरुबा पेटींत ठेवून तो दिवाणखान्यात जाऊन बसला, पण नली कुठली स्वस्थ बसायला, तिनें तो झंकार ऐकला होता. तिनें दिलरुब्याच्या पेटीकडे धाव ठोकली आणि पेटी उघडून पहाते तो दोन तारा तुटलेल्या. रागानें थांवत ती अनीलजवळ आली.

" आई अनीलनी पहा ग माझ्या दिलरुब्याच्या तारा तोडून टाकल्या. '

' थांब हं आतां तुला पहा कसा मार देते. '

' मी नाहीं तोडल्या तारा, तूंच तोडून माझ्यावर नाव घालतेस. '

' थांब बरं का चांगला मार देते कीं येशील कबूल ?' असें म्हणून नलिनीनें एक चापटी जोरानें मारली आणि अनील कळवळून आईजवळ आला.

' आई नलटलीनीं बघ मला मारलंन ! '

‘ कां ग नले अनीलला मारलंस ? ’

‘ आई, दिलरुब्याच्या तारा तोडून मला म्हणतो तूंच तारा तोडल्यास ! ’

‘ थाब आतां मी पण तुला मारतो ’ असं म्हणून अनील नलीला मारण्याकरिता तिच्या पाठीस लागला दोघेहि खूप पळत होती. शेवटीं गेटपाशी अनील नलिनीला पकडणार तोंच नलिनी रस्त्यावर आली. आणि अनील तिचा पदर धरणार इतक्यांत अकल्पितपणें बाबासाहेबांची मोटार गेटमधून वळली आणि अनील मोटारीखालीं सापडला. बाबासाहेबांच्या हृदयात धस्स झाले. नलिनी मात्र बचावली. आईची नजर सहज गेटाकडे गेली. ती दुरून धावतच आली मोठयाने ‘ अनील अनील ’ असा आक्रोश करीत. बाबासाहेब नली, आई, ड्रायव्हर सर्वच रडूं लागली. अनीलच्या डोक्याला मोठी जखम होऊन तो बेशुद्ध पडला होता. ड्रायव्हरने अश्रू पुसून डॉक्टरना फोन केला. पाच मिनिटांत डॉक्टर अवश्यक औषधा निशी हजर झाले पण अनीलचा प्राण निघून गेला होता. आईसुद्धां बेशुद्ध पडली पण डॉक्टरनीं अमोनिया नाकाशीं धरून तिला शुद्धीवर आणली.

अनीलच्या प्रेतयात्रेला माणसांची रीघ लागली होती आणि बाबासाहेब, आई, नली यांच्या हृदयांतील रक्ताचं पाणी होऊन अश्रूचा पाऊस पडत होता.

* * * *

एक महिना झाल्यानंतर थोडा दुःखाचा विसर पडला. तरी पण सर्वत्र उदासीन वातावरण होतें. बाबासाहेबानीं मोटार विकून टाकली आणि ते कारखान्यात पायीं जाऊं लागले. नलिनीसुद्धां शाळा दूर होती तरी पायींच जाऊं लागली. तुटलेल्या दिलरुब्याच्या तारा तशाच पडल्या होत्या.

* * * *

एक दिवस नलिनी शाळेंतून आली आणि पहाते तों अगदीं अनीलसारखी बैठक घालून आई तो तुटलेल्या ताराचा दिलरुबा वाजवीत बसली होती. डोळयांतून अश्रुधारा गालावरून दिलरुब्याच्या तारेवर पडून आधींच बेनूर झालेल्या नादब्रम्हाला शोकाश्रूंचं स्नान घडत होतं. नलिनी तें दृश्य पाहून इतकी गहिंवरली कीं तिच्यानें एक पाऊलसुद्धा पुढें टाकवेना तिच्या मनात एकच विचार आला.

दिलरुब्याच्या तारा तुटायला आणि सर्वांच्या दृष्टीपुढून अनील-रुपी तारा निखळून पडायला एकच वेळ आली.

—दत्त पळधे.

---

# पोटासाठीं : १२

आणि एकाएकीं आडाच्या खोल गाभाऱ्यातून एक हृदयभेदक किंकाळी निनादीत होत्साती बाहेर आली. पण अल्पावकाशातच ती दुपारच्या शांत वातावरणात विलीन पावली. पण हाय ! ती दुःखद व आर्त किंकाळी ऐकण्यास कोणींही चिटपाखरूं आसपास नव्हते. "ती किंकाळी म्हणजे एका गरीब जीवाची जीव तगविण्याची शेवटचीच धडपड होती. " हतहृदयाची हांक " होती. पण हायरे दुर्दैवा ! गरीबाच्या हांकेस कोण " ओ " देणार ? गरीबाचा जन्म काबाडकष्ट करतानाच मरण्यासाठीं असतो असाच जगाचा सिद्धान्त आहे. निढळाच्या घामानें पैसा मिळविणाऱ्या गरीब जीवाचा अंत पोटाची टीचभर खळगी भरताना व्हावयाचा असाच त्याच्या ललाटीं विधात्यानें लेख कोरला तर नाही ना ? प्रत्यक्ष सुख उपभोगण्याचें तर राहो परंतु सुखाचे अशास्वप्न देखील पाहण्याचें त्यांचें भाग्य नाहीं. मग आमचा पाडू तरी त्यास कसा अपवाद ठरणार ?

   

त्या दिवशीं रावसाहेब पानसे यांच्या परसांतील आडाचें पाणी उपसावयाचें होतें. त्याकरितां त्यांनीं गांवांत आडाचें पाणी उपसण्यासाठीं गडी पाहण्यास आपल्या ज्येष्ठ चिरंजीवाला आज्ञा केली. पांडूला एकदाचें काम मिळालें. पाडू आज तीनचार दिवस कामासाठीं वणवण फिरत होता. परंतु बिचाऱ्याचें दैव प्रतिकूल त्याला तो तरी काय करणार? पैशाशिवाय एक एक दिवस कसा जाईल याची त्याला रोज विवंचना पडत असे. युनिव्हर्सिटीच्या पदव्याची ज्यांच्या नावामागे मालिकाची मालिका लागत असून देखील बेकार म्हणून त्यांना जगात वावरावें लागत असताना आमच्या निरक्षर, रोजमुरी धदा करणाऱ्या जीवास कोणची नोकरी मिळणार? रोज दिनमणि गगनांत उगवायचा व रोज मावळायचा. यात खंड असा कधींच पडत नसे. पाडूची स्थिति मात्र दिवस मावळतांच, घरीं जातांना एकाद्या अपराध्याप्रमाणें होत असे. सबंध दिवस गेला परतु खिशांत एक कपर्दिकही नाहीं. आपली बायको आपल्याला काय म्हणेल याची त्यास वारंवार भीति वाटत असे. पांडू कामासाठीं उन्हा–तान्हातून सबंध दिवस वणवण भटकत असे परंतु त्यास विन्मुखच घरीं परतावें लागत असे. पाडूचा चेहरा घरीं येतांना कधींच खुललेला दिसला नाहीं. नाहींतर प्रियजनांच्या भेटी कोणाला अप्रिय आहेत? त्याच्या नशीबाचा हा तो सर्व खेळ होता. तो परिस्थितीनें अगदींच पंगु बनला होता. परंतु गडी मोठ्या धीराचा; आशा आणि हिंमत मात्र त्यानें मुळींच सोडली नाहीं. आशा ही एकाद्या तरुणीप्रमाणें प्रत्येकाला मोहजालांत अडकवीत असते. मग पांडू फसला यांत नवल तें काय? रोज हुरुपानें तो घरांतून निघायचा परंतु रोज निराशेचेंच ताट त्याच्यापुढें वाढून येत असे.

आज त्याचे नशीब जोरावर होतेसें दिसलें. कारण त्याची व रावसाहेबांची गांठ पडली व तो आडातील पाणी उपसण्यास तयार झाला. परंतु त्याला काय माहीत कीं आपल्या भविष्यकालात सर्वत्र अंधकार होता. मानवी प्राण्याला जर आपलें भवितव्य ओळखतां आलें असतें तर त्यानें आपल्या भावी आयुष्याचें मनोरम चित्र

रेखाटून एकाद्या तृषार्त हरणाप्रमाणें मृगजलाच्या मागें लागून आपली फसगत कां म्हणून करून घेतली असती ? मग आज पक्कान्नानें वाढून आलेलें ताट पाडूनें विष म्हणून फेकून नसतें कां दिलें ?

रावसाहेबानीं पाडूला विचारलें, "चल बोल, सबंध आडातील पाणी उपसण्याचे काय घेशील ?" "महाराज, म्या गरीबानें आपणापाशीं काय मागावें ? धनीसाहेब, आपण विचार करून द्यायंचे तें द्या." पांडू काकुळतीनें बोलला. "छेः, छेः, तें कांहीं नाहीं, मग मागून तक्रार नको. जें तुझें घेणें असेल तें एकदम बोल. मग मागाहून खटखट काय कामाची ?" "तर मग धनीसाहेब, पांच बादलीला एक पैशाप्रमाणें मला दाम द्यावेंत" पाडू बोलला.

"वाः वाः वाः ! बराच कीं दिसतोस. उक्ते काय घेशील ते चटकन् बोल." रावसाहेब जरा गर्जतच बोलले. पाडूनें एकदा आशा निराशा मिश्रीत डोळयानें आडात पाण्याचा ठाव पहाण्यास डोकावलें. पांडूची मान जेव्हां वर आली तेव्हां त्याची दृष्टी बरीच भेदरलेली दिसत होती. कारण पाणी फारच खोल होतें. "महाराज पाणी फारच आहे, तेव्हां मेहनतीप्रमाणें मला तीन रुपये मिळाले पाहिजेत." पांडूनें आशाळभूत नजरेनें पाहात विचारलें.

"अरे बापरे तीन रुपये ? कमाल केलीस माझ्या बाबा ! एव्हढयाशा कामाला आणि तीन रुपये ? हॅ हँ हँ !" रावसाहेब भीषणतेनें हंसले.

"मग महाराज आपण काय द्याल ?" पाडू हें फारच जलदीनें बोलला. कारण त्यास भीति पडली कीं हातचे काम जाईल. "देऊं फार तर १॥ रुपया" मालक अगदीं बेपर्वाईनें बोलले.

पांडूची छातींच दडपली गेली. सबंध दिवस जिवापाड श्रम करून हातात दीडच रुपया ! परंतु घरचें संसारचित्र त्याच्या मनः-चक्षूपुढें तात्काळ उभें राहिलें. ती बायकोची व लहान अर्भकाची करुण मूर्ती डोळयासमोर येताच त्यानें तें काम पत्करले.

पाण्याच्या बादल्या भडाभड तो ओतूं लागला. अंगांतून घामाच्या धारा चालल्या होत्या व त्याची चाळणी झालेली फाटकी बंडी

अगदीं ओलींचिंब झाली होती. तरी तो आशाळभूत जीव आपलें काम करीत होता. रावसाहेब एव्हाना निद्रादेवीच्या आधीन झाले होते. परंतु हा बापडा जीव दीड रुपड्यासाठीं उन्हात राबत होता. पन्नास एक बादल्या पाणी उपसले असेल तोच त्यास ग्लानि येऊं लागली. परंतु ग्लानि येऊन करतो काय ? कारण त्यानें आपलें शरीर त्या दिवसापुरते तरी १॥ रुपयास गहाण ठेवले होतें. दमल्यामुळें त्याच्या हातून काम थोडे आस्ते होऊ लागले होतें. पण हायरे नशीबा ! तो पहा जिवापाड श्रम झाल्यामुळे त्याचा झोक जाऊन तो आडात पडला ! त्या कमनशिब्याच्या दुर्दैवानें त्याची हृदय भेदक किंकाळी ऐकण्यास कोणीच जवळपास नव्हते. मग त्यास वाचविणार तरी कोण ? अरेरे ! टिचभर पोटाची खळगी भरण्यासाठीं त्यास आपल्या प्राणाचे मोल द्यावें लागलें ना ? गेला ना बिचाऱ्याचा दीड रुपयांकरितां प्राण !

अर्ध्या तासानें रावसाहेब किती पाणी उपसलें हें पहाण्यास आडावर आले. तो काय ! सर्वत्र सामसूम. बहुतेक पाडू अतिशय कामामुळें पळून गेला असेल अशीं समजूत करून घेऊन रावसाहेब निवासस्थानीं परत आले.

* * * *

दोनतीन दिवसानीं पाडूचें प्रेत पाण्यावर तरंगू लागलें व मग सर्वत्रास पांडूच्या बेपत्ता होण्याचा उलगडा झाला. त्याप्रसंगीं त्याच्या बायकोचा आक्रोश ऐकून एखाद्या पाषाणालाही पाझर फुटला असता. बिचारीच्या जन्माचा सोबती काळानें एका क्षणात हिरावून नेला. लहान बालकें अनाथ झालीं. परतु रावसाहेबांस व जगास काय त्याची खंत. गरीबाचा वाली या जगांत कोण आहे ?

—एस्. एस्. शितोळे.

जीवनानदाच्या गतिमान उतरणीवर दारिद्य हा एक जोराचा धक्काच आहे म्हणायचा ! अन् या अपरिहार्य धक्क्यानें काहीं निरुपद्रवी परतु दुर्दैवी प्राण्यांना आयुष्याचा प्रवासच कायमचा थांबवावा लागतो कित्येकदां !

रामजीहि वरील सत्यस्थितीला अपवाद नव्हता !

परिस्थितीच्या गोलावरील दारिद्र्य हा उष्ण कटिबंधच वाटला त्याला !

दिवाळीच्या आधींचें दिवस म्हणजे किती आल्हाददायक ! चार महिनेपर्यंत अनवरत चाललेली पावसाची चिर चिर थांबून उल्हासदायक प्रकाशमान दिवस दिसायचे ! सबंध वर्षाऋतूभर अंगमेहनत करून स्वतःच्या कष्टाचें मूर्तिमत मोलच असें पिकलेलें पिवळें शेत वाऱ्याच्या झोतावर डुलत असलेलें पाहून कृषीवलहि आनंदी व्हावयाचा; जी काहीं पुस्तकांची नि अभ्यासाची ब्याद असेल ती सुमारे महिनाभर बंद व्हावयाची म्हणून काहीं तत्पर (!)

विद्यार्थ्यांचा सुखाचा काळ सुरू व्हावयाचा व नवसंवत्सराकडे आशेने पहाणारे जमीनदार, सावकार स्वतःच्या एकूण मिळकतीचा विचार करीत असायचे.

गेले चार महिनेपर्यंत जीवापाड मेहनत करून रामजीनें खंडानें घेतलेलें शेत लावलें होते. स्वतःच्या डोक्यावरचा कर्जाचा बोजा डोईजड झाला होता त्याला. त्यामुळें ढासळलेल्या शरीरप्रकृतींतही शक्य तितकें जास्त पीक काढून तो बोजा कमी करायचा आटोकाट यत्न केला त्यानें. त्या सर्व भानगडींत स्वतःच्या सुखदुःखाचा विचार करण्यास तरी त्याला वेळ होता कुठे ? झोंपडीवर टाकलेल्या नव्या माचुंडयामधून जोराच्या बरसातीचें वेळीं ठिपाळ लागें तें बंद करायला त्याच्याजवळ पैंढा नव्हता ! कीं, त्याच्या झोंपडीभोंवतीं सांचलेलें गढूळ पाणी नीट लवून देऊन दलदल कमी करण्यासही तो असमर्थ होता ! कारण, त्यानें तसा घातलेला बांध पाण्याचा फटकारा व पागोळयांचा धोधाटा केव्हांच उडवून देई ! सायंकाळी शेतांवरून आल्यावर श्रान्त जनावराचे मानेवरील नागर तो काढी व त्याच्या पाठीवरून हात फिरवून जवळच्याच दमट ओसरींत त्यांना तो सोडून देई; उपजीविकेचें असें तेवढेंच साधन होतें तें त्याचें !

ऊन नाहीं, वारा नाहीं, पाऊस नाहीं.

गरीबाच्या प्रकृतीवर हवेचा परिणाम होतोच कुठें ?

अशी जगाची हिणावणी असतें हें त्याला उमगत होतें !

कोसळणाऱ्या मेघसर्द आकाशाबरोबरच, त्याच्या मोसमांत कौटुंबिक आपत्तीची तीक्ष्ण कुऱ्हाडहि पडली त्याच्या निवासस्थानावर ! तो, त्याची बायको अन् एक तेरा चवदा वर्षांची त्याची मुलगी–जिजा–एवढीच त्याचीं माणसें ! छे ! पण तें सुद्धां खरें नाहीं ! कारण, दोन महिन्यापूर्वींच त्याची बायको निवर्तली होती.

रामजीला फार दुःख झालें;

परंतु त्याचें प्रदर्शन करण्याची सोय नव्हती.

' चल् बेट्या, कसलं दुःख घेऊन बसला आहेस ? बाईच्या मृत्युचं ? अंह ! गरीबाना का कुठें दुःखं असतात ? अन् असली तरी ती दाखवावयाची नसतात.'

" पोटामागें धावायचं आहे तुला; आपत्तीवर अश्रू ढाळण्यास वेळच आहे कुठें तुला ? चार आठ दिवस दिवस थाबेन म्हणतोस ? मग त्या शेताची निगा कोण राखणार ? त्याची राखण कोण करणार ? पीक पुरेपुर न येता बुडालं तर खंड कोण भरणार मालकाचा, अन् त्याचं तें कर्ज तरी कसं फिटणार ? "

विषण्ण मनानें तो शेतावर गेला.

मानसिक विवचना व शारीरीक क्लेश यांची युति झाल्यावर मृत्युचा धरणीकंप व्हावयाला उशीर असतो का ?

पावसापाण्यातील चिरंतन अंगमेहनतीनें त्याची प्रकृती ढासळली !

दुःखाचा आवेग दिवसानुदिवस कमी होतों ना ? जिजाकडे पाहून बायकोच्या वियोगाचें दुःख, तो गिळण्याचा प्रयत्न करी !

दिवसामागून दिवस उगवे; आपल्या कामाचें मागें त्याचें शरीर धावें, दिवस मावळे, सायंकाळ होऊन अधार पडे, अन् झोंपडींत परतल्यावर सर्वत्र उदासीनतेचा दाट काळोख दिसे त्याला;

हळुहळु, भरलेला ताप, तो अगावरच बाळगून राही ! मुरलेल्या तापानें नकळत तो मृत्यूच्या सान्निध्यांत जात होता.

पावसाळा संपला !

दिवाळीचा उत्सवही जवळ आला;

तात्यासाहेबांच्या ( त्याच्या जमीनदाराच्या ) घरीं सर्व माणसें आनंदांत होती. त्याच्या ओटीवर वसुलीचा हिशेब चाललेला असे, घरांत मिष्टान्नांची झिम्मड उडत असे, व अंगणांत त्यांची लहान मुलें बागडत असत ! दिवाळीचा किल्ला त्यांनीं केला होता, अगण सारवलें होतें व दीपावलीचा नेहमींचा शिरस्ता पार पाडण्याचे आश्वासनही तात्यासाहेबाकडून मिळविलें होतें; " काय कमी होतें ?" असेच त्यांचें मन समाधानानें विचारीत असे.

रामजी अंथरुणाला खिळून होता. खंड देण्यापुरताच तो जमीनदाराकडे गेला होता. जमीनदारानें मामुली पद्धतीनें रामजीची विचारपूस केली, वसूल मोजून घेतला. व कर्जाची फेड शक्य तितक्या जलदीनें करण्याची तंबीही दिली रामजीला ! तेथून रामजी परत घरीं गेला, त्यावर मालकाला भेटण्यास जाण्यालाही त्याला सामर्थ्य नव्हतें. गुलाबी थंडींत त्याच्या झोंपडीच्या नजीकच्या खडकावरच एकादी गवताची गुंडी पेटवून त्याचे गांवकरी, शेजारी, शेकोटी करीत, रामजीचें मन मात्र बायकोच्या विरहाच्या जाळानें चटकत होते व अंगातील तापानें फणफणत होते. बाहेरील थंडीपेक्षाहीं त्याचें मनच अधिक बधीर होते ! रात्रच्या रात्र तारवटलेल्या डोळ्यानें तो जागाच राही ! आपण आतां फार दिवस जगत नाहीं, असेंच वाटे त्याला; काहीं कांहीं वेळां अकस्मात् जाग येऊन तो उठे, जिजाच्या कांबळ्याशेजारी जाई अन् बराच वेळ तिच्याकडे पहात राही ! आपल्या गेलेल्या कारभारणीचीच आठवण करून देई, तिचें निष्पाप मुखकमल त्याला ! एक निःश्वास तो टाकी, अन् परत आपल्या जागेवर सरपटत जाऊन, झोंपी जाई. त्याच्या या दैन्याची जिजालाही जाणीव होती.

बापाचे दुःख कमी करण्याचा ती प्रयत्न करी !

ती कांहीं खाण्याचें करीं, त्याचे चार घांस रामजी पोटांत ढकली व वर पाण्याचा घोट ढोसत असे ! परतु ही सर्व क्रियाही यान्त्रिकपणेंच होई त्याची ! त्याचा घास तोंडांत फिरत राही व बळें त्याला तो गिळावा लागे; त्या जीवनसत्त्वावरच आतापर्यंत त्याचा जीव दम धरून होता.

अशा दुर्दशेंत मालकाच्या अंगणांत दरवर्षीप्रमाणें मांडव उभा-करावयाचा, हुकुम मिळाला त्याला; अंगातला ताप उतरला, म्हणजे मालकाच्या जागेत दोन चर खणी तो, नि परत झोंपडींत येऊन तापानें बेजार होऊन पडे ! तीन दिवसांत सर्व मांडव उभा केला त्यानें. परंतु अशा करण्यानें त्याच्या शरीराचा मंडप मात्र मोडकळीस आला !

दिपवाळीच्या आदलाच दिवस.

सकाळपासूनच त्याची तापांतील बडबड सुरू होती. जिजा त्याला सांवरण्याचा प्रयत्न करी, परतु दुर्दैवानें उधळलेला जीवनपट, मनुष्य सारखा करूं शकत नाहीं; त्याची अत्यवस्थ स्थिती पाहून तिच्या बाळमनांत खळबळ उडाली. सकाळपासून त्यानें कांहींही खाल्लें नव्हतें ! पाण्याचे चार घोट तेवढेच त्याच्या पोटांत गेले होते.

" चिराग्यांची झुंबरं लागल्याशिवाय शोभा वाढणार नाहीं मंडपाची !"

" हो तर ! दरवर्षीच लावतो आपण तीं ! "

" रामजीला बोलावायला हवं ना ? "

" हो तात्या; "

" एकदां गेला, तो परत येतो आहे कशाला तोंड दाखवयाला तो ! जा बोलावून आणा, आजच्या आज झालं पाहिजे म्हणावं हें काम. "

दुपारींच तात्यासाहेबाच्या घरांत हा संवाद झाला.

सध्याकाळी दिवे लावायच्या किंचित् अगोदर रामजीला मालकाचा वरील हुकुम आला.

" मी बेमार आहे तात्या, " रामजीनें निरोप धाडला.

" मग तुझ्या मुलीला धाड; " परत हुकुम आला; " तूं आजारी आहेस तर काय, हें काम मी करूं होय ? प्रतिवर्षाचा शिरस्ता आहे तो आमचा; तें कांहीं नाहीं; आजच्या आज झालंच पाहिजे हें; आजची रात्र टाळतां कामा नये ! "

रामजीनें जिजाकडे दृष्टी टाकली.

खंगून गेलेल्या, त्याच्या दुर्बल दृष्टीच्या निस्तेज नेत्रांची हाल-चाल होती ती. त्यात जिजाला कांहींतरी भयंकर वाटलें. तिनें त्याच्याकडे पाहिलें—

" जा बाळ, तेवढं करून टाक; मालक रागावेल तर निभाव कसा लागेल आपला गरीबाचा ? वाटोळं करील तो ! गेल्यावर्षीचे

पैसे फिटले नाहींत अजून, उद्याच तर दिपवाळीचा दिवस आहे, जा!" खोल आवजात रामजी म्हणाला.

जिजानें चिराटी आणली गोळा करून!

ती आडवी फोडली तिनें.

मालकाच्या माडवाच्या बाजूच्या निवडुंगावर पाच पंचवीस शेणाचे गोळे थापून त्यावर तिनें चिराटी बसविली, अन् तेल वात करून ती घरीं परतली.

मालकाच्या अंगणांत तेलदीप उजळले.

तिकडून परतताना, धुळीनें भरलेले रस्ते झटाझट् तुडवीत ती चालली होती. जाताना आडव्या पळालेल्या माजराला पाहून तिचें मन चरकलें. ती अधिकच जलदीनें घरीं जावयाला लागली. तिच्या हृदयांत धडकी भरली होती, मन बेताल झालें होतें व पाय चटचट भूभाग आक्रमित होते. ती झोंपडीजवळ धावतच पोंहोंचली; आंत जाताच क्षीण व फिकट उजेडाची दिवलीही तिनें पेटविली.

रामजी, आयुष्याच्या शेवटच्या पायरीवर उभा होता.

" जिजा! जिजा!" तो बराच वेळ हाक मारीत होता असें दिसले जिजाला.

" जिजा, ये, इकडे ये!" तिला पहातांच तो ओरडला.

" बाबा? बाबा, !" त्याच्या ताठरलेल्या शरीराजवळ ती सरकली. त्यानें पसरलेल्या दोन्ही हातांत, त्याला ती बिलगली. त्याच्या हृदयाशी डोकें लावून तिनें डोळे मिटले. सजीव कायेच्या प्रेमळ पित्याचा चेतनामय असा शेवटचाच हस्तस्पर्श होता तो! तिनें टाहो फोडला.

दिवलीच्या पुसट प्रकाशात, त्या दीन झोंपडींतील शुष्क संसार छायारूपानें जवळच्याच शेणकुडावर मागेंपुढें होत होता; वळचणीला रात्र किर्र्र् ओरडत होती. सर्वत्र भीषण शांतता पसरली होती. रामजीची गतप्राण काया, त्याच्या अंगाखालच्या फाटक्या कांबळ्यावर ताठरलेली होती. अन् दूर कोठेंतरी एक टिटवी "टिव् टिव्" ओरडली.

जिजा ढसढसां रडली. तिच्या शेजारचा एक शेतकरी तिचें सात्वन करीत होता.

त्या अंधुक प्रकाशात रामजीच्या मुद्रेकडे मधूनच ती पाही व परत वाढत्या आवेगाच्या आंसवाना वाट देई !

जमीनदार तात्यासाहेबाच्या अंगणांत त्यावर्षी, त्या रात्रीपासून सर्व दिवाळीभर चिरांड्यांचें झुंबर झळकत होतें; दारिद्र्याच्या परवशतेची झळ मात्र रामजीच्या मृत्यूरूपानें त्याच्या झोपडींत जिजाला लागत होती. तात्यासाहेबाच्या अगणात त्याचीं मुले मजेनें नाचत होती. पण त्याच्या त्या आनंदापेक्षाहीं अधिक शोकानें बापाच्या मृत्युनें जिजा मात्र "हाय हाय" म्हणत विव्हळ झाली होती.

लोक म्हणत—" रामजी आजारानें मेला ! "

जिजा म्हणे–" दारिद्र्याचा बळी होता तो ! "

त्यावर्षी दिपवाळी नेहमींप्रमाणेंच त्या गांवांत येऊन गेली. तो सांवत्सारिक आनंदही सर्वच घरांत साजरा केला गेला. सावकाराच्या व जमीनदारांच्या घरात नेहमीप्रमाणेंच दीप लकाकत होते. रामजीच्या झोपडींतही एकच काय पण असंख्य दीप तेजोमय झाले होते. मात्र ते तेलाचे नव्हते. तर जिजानें ढाळलेल्या व मिणमिण् करणाऱ्या पंतीच्या दरिद्री प्रकाशात चमकणाऱ्या कढत आसवाचे होते !

—वि. श्री. जोशी

# माझं लग्न : १४

लग्न म्हटलं म्हणजे कोणाहि तरुणाच्या अतःकरणाला गुदगुल्या व्हायच्याच! शरीर थोडेसें कंपायमान होऊन एकदां गोड दरदरून घाम यायचा आणि नंदनवनांतील पक्षाची गोड किलबिल ऐकतां ऐकतां हिरवळीवर आडवें पडून आनंदानं शीळ वाजवीत त्यातच खूप एकजीव व्हायचं! जगाला विसरायचं!!

ह्या मानवी भावनांना मीच अपवाद कसा ठरणार? परंतु तो मार्च महिना असून माझी इंटरची परीक्षा पंधरा दिवसांवर आली होती. त्यांतल्या त्यांत मला मुली सांगून येत आहेत अशी वडिलांच्या पत्रांतील माहिती वाचून मी आता भाव खाणार असें मला वाटूं लागलें. परंतु काहीं आततायी भावी श्वशुरानीं माझा अगदीं छळ मांडला! शिंचे पत्र लिहिणारे सासरे तरी कसे बेवकूप, कीं बुवा जांवईबुवांची परीक्षा आली आहे, आपण का सध्या त्रास द्या! पण छे! मला आठवतें दररोजचीं दोन्ही वेळ मिळून मला एक दिवस सत्रा पत्रें आलीं!

कल्पना करा कीं तो हंगाम मंदी होता कां तेजी होता? नवऱ्या मुलींचे ताफेच्या ताफे तयार असल्यावर त्यांना तेजी कशी म्हणायची? तो सारा खारकाचा माल लग्नाच्या बाजारांतून उठेना म्हणून तर माझी ही मनधरणी! आणि मजवर पत्रपुष्पाचा वर्षाव! मनी-ऑर्डर कधीं पाठवितों म्हणून वडिलांचीं पत्रे पाहणें जरूरच होतें परंतु उलट मी येथें बँकेंत ठेविलेल्या रकमेच्या व्याजाचीच ते मधून मधून विचारणा करीत! पुन्हा भावी श्वशुरांचे आतले आवाज फेंकून देण्याचा वेडेपणा कोणता शहाणा जांवई करणार? न जाणो क्वचित् आपल्या गुणांचेच त्यांत मधूनमधून वर्णन सापडल्यामुळें अंगावर मूठभर मांस चढायचें! तेव्हा अशीं उत्तेजनपर पत्रें नकोत कां वाचायला? त्याशिवाय चुकून माकून बहुतेक प्रत्येक पाकिटांत एकादा नाजूक फोटो आढळायचाच......असे जवळ जवळ चाळीस फोटो जमवून मी माझ्या अभ्यासाच्या पुस्तकातून पेरून दिले होते! कारण असें कीं, मला त्यामुळें स्फूर्ति येई व मी एकाद्या भावगीताला जन्म देई! त्यावेळच्या माझ्या कविता पाहिल्या म्हणजे माझ्या प्रतिभेबद्दल मला पुन्हां आत्मविश्वास वाटूं लागतो.

मोहना! त्या एका युवतीच्या नांवाबरोबर तीहि मला फार आवडली व आठवण झाली कीं मी झटकन् तिचा फोटो कुठून तरी काढतो व माझ्या "याचना आणि यातना!" ह्या कवितेच्या ओळी गुणगुणत असतो!

ती अठरा मार्चची गोष्ट. वडिलांचें एक तारेसारखें पाकीट आलें मला. त्यांनीं लिहिलें होतें कीं, २९ तारखेला परीक्षा संपली कीं तावडतोब निघून ये. येथें ३१ ला मंडळी नारळाला येणार आहेत.

शेजारचा दिग्या जोशी होतांच खोलींत माझ्या.

मी खूप संतापलों वडिलांवर. "माझ्या संमतीशिवाय त्यांना हा कोणी कारभार करायला सांगितला? लग्न माझें का त्यांचें? नाहीं तरी हीं जुनी माणसं भारीच बुवा! अगदीं म्हणून चालूं देत नाहींत आणि माणसाच्या आयुष्याची माती माती करून टाकतात!

मी खूप ढसाढसा रडलों. माझें सांत्वन आईच करूं जाणें, तें दिग्या काय करणार? तिला हें माहित होतें कीं माझें हें असें आहे म्हणून! परतु ती राहिली चारशें मैलावर अन् मी इथें. मला दोन ध्रुवातल अतर भासल तें! मी सारखा तडफडत होतो आणि माझ्याच झिटग्या मी ओढून ताणूक दातावर दात चावीत होतो—ते कोणावर तर वडिलांवर! वडील माझे काहीं शत्रू नव्हत परंतु त्यांनीं माझ्या जीवन नाटकातील खल पुरुषाचीं भूमिका करावयाचें दिसल्यापासून माझे डोळे पांढरे व्हायचा वखत आला! लहानपणीं आई म्हणत असें कीं, "जगूच्या मनासारखं जर झाल नाहीं तर त्याला फीट येई" मला माझंच आतां भान नाहीसं झालं आणि खरोखरच मला आकडी येणार असें वाटूं लागताच माझी पांचावर धारण बसली! आता काय करणार?

सांत्वनाकरितां आई जवळ नाहीं, बरें खोलींत तेवढा दिग्याच! तो माझ्या जवळच आहे हें पाहून काहीं एक विचार न करता त्याच्या वक्षस्थळावर मी माझा देह फेंकून दिला! नाहीं म्हणायला तो अगदींच प्रेमळ नव्हता असें नाहीं परतु त्यानें मला वेडयांत काढलें व अभ्यासाचें निमित्त पुढें करून आपला जाऊ लागला!

आतां हृद्गत ओकल्याशिवाय इलाज नाहीं म्हणून मी सारी हकीकत त्याला निवेदन केली व पुन्हा गळा काढला! परतु पोरींच्या फोटोची दंगल त्याला माहीत असल्यानें त्यानें धीराची भाषा बोलण्यास सुरवात केली. त्याचें म्हणणेंहि मला पटलें. जीं माणसं मुलाला फोटो पाठवितात तीं त्याच्या संमतीशिवाय त्याचें लग्न ठरवितील ही समजूत कोती व मूर्खपणाची असल्याचें माझें मलाच वाटूं लागलें व हंसूहि पण आलें! पुन्हां सर्व फोटोंत मला बहुतेक सर्वच पसंत......त्यांतल्या त्यात मोहनाच बरी! एक वेळ तर माझ्या मनांत विचार आला होता कीं, एकापेक्षां अधिक बायका करण्याची चाल आपल्याकडे प्रचारात आहेच! जरी मी राजा नसलों, प्रधान नसलों, सरदार नसलों, कुणाच्या माडीवर गेलेला

ऐतखाऊ दत्तक नसलों तरी पांचसात बायका पोसण्याला व त्यांचा आरोग्यमय यथातथा संसार चालवायला मी कांही नालायक नाहीं.

मी पुन्हा अभ्यासाला लागलो पण तें जमेना. पुस्तकाच्या पानापानातून पेरलेल्या छबेल्या पाहिल्या म्हणजे माझ्या जीवाचं पानागत पाणी व्हायला सुरवात होई. ह्यापैकीं कोणत्या देवतेनें माझा अधिकार स्वीकार करावयाचें ठरविलें आहे ह्या विचारांत माझा केव्हा डोळा लागला राम जाणे!

मी सकाळीं जागा झालों तो शेजारच्या दिग्याच्या गजरानं. चांगले आठ वाजले असतील. त्यानें माझी ही केलेली थट्टा पाहून मी शरमलो मात्र. खोलींतला दिवा तसाच ढणढणत होता. तो मी खिटी दाबून बंद केला अन् पाहतों तों पुस्तक कॉटवरच अस्ताव्यस्त पडलेलें! आणि त्या पंचवीसतीस तरुणींच्या फोटोंचा माझ्याभोंवतीं पानापानातून निखळून पडल्यानें जमलेला तो ताडा!!

मला संताप आला. माझ्या खडतर परीक्षेचा तपोनाश करण्यासाठीं ह्यांनीं ह्या मेनका तर नाहीं ना पाठविल्या......आं? छे! तें कांहीं नाहीं या मायामोहातून सुटून परीक्षेला लागलंच पाहिजे!

माझ डोकं भणभणूं लागलं. मी विचार केला. खूप विचार केला. आणि ते सगळे फोटो गुडाळून थेट दिले पेटींत कपड्याच्या खालीं दडपून कीं, पुन्हां परीक्षा झाल्याशिवाय ह्या अवदसांचीं तोंडं नकोत पहायला!

परंतु परीक्षेच्या दिवशींच माझ्या मोहना--प्रेमानं उचल खाल्ली! कांहीं झालें तरी ती आपली आराध्य देवता! तेव्हां त्या देवतेचं दर्शन न घेता कार्याला लागणं कृतघ्नपणा नव्हे काय? तेव्हां मोहनेचं दर्शन घेऊनच मी परीक्षा-मंडपात जावयाचें ठरविलें. त्याबरोबर हाच विचार केला कीं, साधारणतः जमल्यास त्या पोरीं पैकीं मोहनेशींच लग्न करायचें! वडिलांचाच अंश माझ्यात उतरला असल्यानें माझ्या आवडीप्रमाणेंच वडिलांनाहि हीच सून पसंत पडणें अगदीं साहजिक आहे असले व्रात्य विचार परीक्षेला

जातांना माझ्या डोक्यांत हिरव्या गवताप्रमाणें बूड धरून हळूंहळूं डोलूं लागले !

मी परीक्षेला निघालों पण म्हटलं मोहनेचा फोटो असूंच द्यावा जवळ ...... परंतु पेपर लिहितांना मला काहींच सुचेना, जीं पानं फोटो पहातां पहाता मी उलटलीं तीं पुन्हा त्याच मूर्तीच्या दर्शना शिवाय कशीं आठवणार? बरें, फोटो तर खोलीवर राहिलेले ! त्यामुळं माझी चुंबाचुंबी झाली ! परंतु घागरभर पाण्याची तहान एका गोड मोसंबीनें भागतें असें म्हणतात त्याप्रमाणं त्या परीक्षा मंडपांतील रुक्ष वाळवंटातली माझ्याजवळची ती मोहना ! तो फोटो दिला मी पेपराच्याखालीं ठेऊन !! त्यामुळं मला काहींसें आठवलें खरें ! नाहीं म्हणून एकाद्या कुमारिकेचा अपमान का करायचा ? तिनें मला स्फूर्ति दिली परतु फोटो एकच असल्यामुळें एका पानाच्या बाहेर माझी गति कशी जाणार ? देखरेखदाराची दृष्टि चुकवून पुनः पुनः फोटो पाहून काहीं स्फूर्ति पान्हवते का म्हणून मी सारखी उघडझांप चालविली आणि नेमक्या ह्याच कारणानें आमच्या नशिबानें उलटी टाग खाल्ली ! देखरेखदार मि. मोने माझ्याच रोखानें आपली भेदक नजर लावीत येत असलेले पाहून माझ्या डोळ्यापुढ काजवे चमकूं लागले ! आपल्या पापाचे घडे भरले असें मला वाटलें. परंतु त्यातल्यात्यात प्रसंगावधान राखून मी चटकन् मोहनेचा फोटो दिला कोटाच्या आतल्या खिशांत कोंबून ! एक पाप झाकायला दुसरे पाप करून बसलों...

“ कॉपी करता होय ? ... पाहूं कायतें ! ” मि. मोने गरजले.

“ सर, ते माझ खाजगी आहे आणि कोणत्याहि कारणांवर तें मला दाखविता यायचें नाहीं ” मी ठांसून सागितलें. परंतु शांतता रक्षक मि. मोने यानीं माझ्यावर गहजब केला.

मला लगेच मुख्यांपुढें खेंचण्यात येऊन गि. मोन्यानीं वरील गोष्टीचें थोडक्यांत विवेचन केलें. मुलें कॉपीचीं पानें फेंकून देतात परंतु माझ्या मोहनेला मी काय म्हणून अंतरणार ? नेमका तोच

फोटो मि. मोन्यांनीं मुख्यांपुढें धरल्यावर जो हंशा पिकला म्हणून सांगू...माझा पेपर परत देण्यात आला परंतु काळ थोडाच थांबतो ? मी जरा सांवरून बसतो तोंच घंटा झाली आणि त्या दुष्टानं तो पेपर हिसकलाही!

पुढील तीन दिवसांचीहि तीच तऱ्हा. मि. मोने ह्यांची मजवर कडक नजर असल्यानें परीक्षेच्या वेळांत माझ्या मोहनेचंहि दर्शन घ्यायची मला चोरी झाली!

झाले. २९ तारीख उजाडली. परीक्षा संपली आणि माझे पाय घराकडे वळले! घराबरोबरच मोहनेकडे माझे डोळे लागले होते. दाराच्या उंबरठ्यांत चढतो न चढतो तों वडिलांची ही भाषा!

"तुला पत्र लिहिलंच होतं. पाहुणे नारळाला कालचे आले आहेत ... परभणीचे पाडे आहेत... मोठं स्थळ श्रीमंत आहे ... पुन्हां आपल्या श्रीधरच्याच मध्यस्थीनें—माझा मामेभाऊ—नव्हे, त्यानंच त्यांना पुढं घालून आणलं आहे ... श्रीधरच्या बाहेर ते एकहि शब्द नाहीत. पुन्हां दीड हजार हुंडा ठरला आहे ... हो! तें तर राहिलंच तुला सांगायचं."

एवढ्या भाषणात मोहनेचाच काय पण नवऱ्या पोरीचासुद्धां उल्लेख नसल्यामुळें माझा घात झाला म्हणून मी कपाळावर हात मारून घेतला! माझ्या तोटक्या घरात पाहुणेमंडळीसमोर रडायची देखील सोय नव्हती!

मला वाटलं मी बंड करावं परंतु माझं प्रेम मोहनेवर बसलं आहे असं सांगायला जावं तर तिला कुठं धुंडाळायची! बाप दाखीव नाहीं तर श्राद्ध कर. मोहना आण नाहींतर लग्न कर मुकाट्यानं असं म्हटलं म्हणजे काय घ्या! बरं ह्यांच्यासारखा तिचा बाप थोडाच पुढें होऊन आला होता? पुन्हां प्रेमाच्या बाजारांत परस्पर देवाण घेवाण हवी! उद्या समजा मोहनेनं आमचं ध्यान (?) पाहिलं आणखी नाक मुरडलं म्हणजे आली कीं नाहीं आफत? पुन्हां आमच्या परीक्षेचें काय आकाशदिवे लागले होतें ते आम्हांला माहितच. आतां अनायासें लक्ष्मी घरीं चालून आली आहे तर कां

मोडा द्या ? नाहीं तरी आपलं कुणाशी तरी लग्न व्हावं असं गेल्या दोन वर्षांत मला सारखं जाणवत होतं ! आणि ३०-४० तरुणींचा तो ताफा माझ्या पाकिटात पडल्या दिवसापासून साधारणतः त्याच्या सर्वांकरितांच मी सारखा झुरत होतो (!) परतु प्रत्यक्ष भेट कोणाचीच झाली नसल्यानें प्रत्यक्ष फोटोवरूनच प्रेम बसलें असल्याचें समजणें मी मूर्खपणाचें ठरविलें व जमेल तर हेंच ठीक म्हणून कशीतरी बायको पदरांत पाडून घ्यायच्या मागें लागलों.

३१ तारीख उजाडली, आमच्या दारीं चौघडा झडला ! गांवांतील बडीं धेंडें बोलावणीं कर करून बोलावण्यात आलीं ! आमच्या मातोश्रींनींहि गांवांतील सभ्य सभ्य आयाबाया नारळाला साक्षीदार म्हणून जमा केल्या. आमच्या मामेसासऱ्यानें नारळादि व्यावहारिक द्रव्यासह आमच्या पसरल्या पदरात सामान ओतलें व मला एकदांचा टिळा लावला ! श्रीधरनेंहि दीड हजार हुंड्याचा पुकार केला व मंडळी चाट होऊन पुष्कळशा खणानारळानिशी आम्हांला बुडवून निघून गेली. तीथ कळवितोंच म्हणून पाहुणेहि परभणीला निघून गेले !

अशा रीतीनें एकदाचें माझें लग्न ठरलें. माझं पुण्य फळाला आलं व माझा दीड हजार रुपये भाव आला ! पुढें तीनच आठवडे उरले होते कारण मग लवकर तीथ नव्हती परंतु मला तीनच बोट स्वर्ग उरला होता. बड्या माणसाशीं आमची ही गांठ ! वडिलांनीं इकडे तिकडे करून बरीच रक्कम उभी केली. वाकी, तोडया, मूद अग्रफुलासगट किती तरी दागिने तयार झाले ... मला तर नांवहि आठवत नाहींत पहा ! मग ! मोठ्यांशीं आमचा सामना होता ! इतक्या घागरभर हुंड्याला टोपलीभर दागिने हवेच ! वडिलांनीं थेट मुंबईला जाऊन भरजरीचा पाचसातशेंचा माल खरेदी केला. पैठणी, शालू, शेला, पोटझाकण, मूद ओवाळणं, चार साड्या, चार चोळ्या, चार गरसोळ्या ...... शिवाय माझं झाडून सारं कापड ... झालं ...

श्रीधरची बायकोच मानकरीण म्हणून आपल्या लेंढरासगट आमच्या घरीं ठाण मांडून बसली. माझ्या सख्या बहिणीचा मान असा उपटल्याबद्दल मला फार दुःख झाले. परंतु ती दुःख करायची वेळ होती का? पत्रं पोहोचल्याबरोबर चार मामेभावाच्या चार बायका, दोन आत्या व त्याचे चिरंजीव व चिरंजीविका, दोन धाकटे मामा आणि आईची आई इत्यादिकांनीं आमच्या शहर वस्तीच्या तोटक्या घरांत धूम मचवून दिली! इतक्याचा दोन्ही वेळचा इंडाभर चहा शिवाय दोन्ही वेळचा खानाखर्च! सारखी लगीन घाईच ती!!

जाणारा येणारा गृहस्थ घरात वाकून पहायचा आणि वडिलांना विचारायचा; "कधींची तीथ?" तेव्हा ते म्हणायचे; "यायचेंच आहे पत्र कीं छापतोच पत्रिका!"

असें करता करता पुरे तीन आठवडे झाले! तरी परभणीच्या पांडयांचें एका बोटभर चिटोऱ्यानें उत्तर आलें असेल तर शपथ! श्रीधरनं माझ्या व्यवहारांत हा असला चोंबडेपणा केल्याबद्दल मी संतापलो. मला तो दिवस आठवला. श्रीधर–हुडयाच्या बाबतींत त्या गृहस्थाला काहीं सुनावीत होता तेव्हा......

" अंसा नक्षत्रासारखा मुलगा आणि सोन्याचा मळा मिळायचा नाहीं म्हटलं! दीड हजारच काय, पण तुमची सारी इस्टेट विकली तरी असा हिरा मिळायचा नाही!" असलीच काही तरी ती भाषा होती आणि मुलींचे मामा आपले तोंडात मारल्यासारखें ऐकत होते!

माझ्यासारख्या हिऱ्याला आपली हिरकणी सारखी पोरगी स्वाधीन करीत असतांना सगळ्या संपत्तीचा गडगणेर करणारे पाडे लोक खास खास वेडे नव्हत. मी हें वडिलाना सागितलेंहि परंतु अब्रू जायची पाळी आली त्याला उपाय काय? एकदां कां अब्रू गेली कीं मग ह्या हिऱ्याचा कोळसा होणार ना? गांवांत तर दीड हजाराची बोंब!

आता काय करावें हाच विचार मला एकाद्या शल्यासारखा बों
लागला. माझें डोकें अगदींच नापिक नव्हतें. ! मी मोहनेच्या बापाल
—माझी मोहना ती !—लिहिलें परंतु जांवईबुवा इतके पाचट असती
असें आम्हांस वाटलें नव्हतें असें वडिलाना परस्पर लिहिल्यानं त्य
चादल्डयानंहि मला चांगलीच चपराक दिली !

परंतु मी हताश झालों नाहीं. अजूनहि लग्नमगाई चालूच होतं
परंतु छे ! शेवटीं भेच्या मध्यावर आमच्या घरातील पाहुणेमडळ
ओसरू लागली. त्याची त्यानाच लाज वाटू लागली कीं काय को
जाणे ! परतु ठरतें ठरतें म्हणून त्या सर्वांनीं जी पथारी टाकिल
होती त्यामुळें पोह्या—चिवड्या चहा जेवणासकट आमच्या जवळ
जवळ अडीचशें रुपयाचे चुरमुरे झाले आणि हातीं संसाराची मात
सुद्धा आली नाहीं ! इकडे आमच्या परीक्षेचा तो असा दिवा लाग
त्यानें वडिलांच्या क्रोधाग्नींत आणखी तेल ओतण्याचं आम्ही पा
केलं.........

परतु ह्याला जबाबदार कोण ?

त्यानीं आणखी एक स्थळ जमवून आणलें......अहो, लग्न
सराईच ती ! मी मनाशीं म्हटलें, आता बुडत्याचा पाय खोलां
जायचा. करीन तर परभणीकराच्या पोरीशींच लग्न करीन अस
माझा मीच निश्चय जाहीर केल्यानें सर्वांचे प्रयत्न खुटले !

ती लग्नसराई निघून जायला आज पक्कीं दोन वर्षें होऊन गेलं
आहेत. माझ्या त्या मोहनेचं—जिच्याकरिता मी माझं सर्वस्व वेंचत
ती माझी मोहना !—तिचं आतापर्यंत बहुतेक लग्न झालंच असेल
कारण मुलांच लग्न न झालं तरी चालत......मी म्हणतो, जन्मभ
नाहीं झालं तरी चालतं......परंतु मुली कशा राहणार ? त्या माझ्य
हृदय शारदेचं...! हा शब्द मी कोणत्या आधारानं वापरू ? पण
काय हरकत आहे ? मात्र त्या स्वरूपराणीच्या छायाचित्राला मं
असं...मधून मधून...कुशींत घेऊन न्याहाळीत असतो......
तो फोटो एन्लार्जच करून घ्यायचा विचार आहे माझा !...तिल

हें समजलं तर.........तर तर काय ? तो तिच्या बापाचा मूर्ख-पणा......जाऊंच द्या झालं त्या गोष्टी......

मित्रहो ! त्या मोहनेच्या प्रेमभंगानंतर मी बरेच हातपाय आपटले. नानादेश फिरलों परंतु अजून कोठेंच जुळत नाहीं. म्हणजे असें कीं कोणी झडझून येतच नाहीं. तसं माझ्यात काय व्यंग आहे हें तुह्मीच पहा. पुन्हा एकदा इंटरनं मला गच्चू दिल्यानं सध्यां मी येथेंच किराणामालाच दुकान घालून आहे. मी माझ्या त्या सान्या मेनकाचे फोटो जतन करून ठेविले आहेत कारण मी मोठा आशावादी आहे. जमलेंच तर ह्याच जन्मात एक चागलेसें टुमदार लग्न करून त्या सर्व अवदासांचा सूड घेण्याचा माझा विचार आहे. परंतु ही सर्व गोष्ट सर्वस्वी तुमच्यासारख्या मित्रांच्या कॅन्व्ह-सिंगवर अवलबून आहे. तशी मधून मधून सुदृढ व सुस्वरूप अशी कोणत्याहि उच्च जातीची वधू पाहिजे म्हणून जी एक 'नवाकाळांत' जाहिरात येत असते ती माझीच होय हें आपल जाता जाता सांगून ठेवतों. गरजूंनीं ह्या सुवर्ण सधीचा अवश्य फायदा घ्यावा !

—मार्तंड बळवंत तरटे.

बी. ए. ( ऑनर्स )

## बालहत्या : १५

[ जाति : उद्धव ]

ऐकावें घडलें नवल । मारिलें आइनें मूल !
जगतांत दिव्य प्रीतीची । आईच निर्मला खाण
प्रेमाची मङ्गल मूर्ती । आईचें अंतःकरण
उपमा न तियेच्या प्रेमा । त्रिभुवनीं पहा शोधून
मातेची वत्सल माया ।
जणु कल्पतरूची छाया ।
बाल्यांत विसावा घ्याया ।
परि सत्य जाहले बोल । मारिलें आइनें मूल

कोपला दयाळू देव । पृथ्वीवर ये दुष्काळ
दुःखानें वेडी वसुधा । जाहलाच हलकल्लोळ
किति गुरें, वासरें गाई । ओढून नेतसे काळ !
खावयास नाहीं अन्न ।
तडफडूनी पाण्यावीण ।
कितिएक सोडिती प्राण ।
ये असा भयङ्कर काळ । मारिलें आइनें मूल

दुष्काळी होतें काम । तो रस्ता करण्यासाठीं
किति अनाथ जमले जीव । तेथेच खडी फोडीती
राबून दिनभरी तेथ । रातीस घेत विश्रान्ती
खावया वाळला तुकडा ।
अंगावर नाहीं कपडा ।
थण्डींत देहही उघडा !
पाङ्घरण्या गगन विशाल । मारिलें आइनें मूल

वर्षतो जणूं का अग्नी । चण्डभानु तळपे डोई
रखरखतें ऊन्ह सभोंतीं । अंगाची लाहीलाही
करपत्या देह वेलींना । पाण्याची ओंजळ नाहीं
फोडावे काळे दगड ।
चाललेंच काम अखण्ड ।
सांवलीस नाहीं झाड ।
पेटला सभोंतीं जाळ । मारिलें आइनें मूल

कुणि अनाथ विधवा तेथें । कष्टते हाल सोसून
' मञ्जुळा ' तियेचें नांव । हो श्रान्त खडी फोडून
वणव्यांत तीव्र दुःखाच्या । सांपडली हरिणी दीन

( जणुं पाप सात जन्माचें । घेतसें देव फेडून )
पतिराज अन्न ना म्हणुन ।
तिज अनाथ गेला करुन ।
एकटी जगीं ती दीन !
प्रसुतीची येई वेळ ! मारिलें आइनें मूल

घेउनिया हातीं टाकी । भाळींचा निथळित घाम
पोटांत अभागी बाळ । बाळगून करिते काम
वेदना भयंकर येती । वदतसे मुखानें ' राम '
उचलली टाकि हातांत ।
राहिली जेथल्या तेथ !
तेथेंच होइ बाळन्त ।
येउनिया पडली भूल । मारिलें आइनें मूल

तळमळे असह दुःखानें । शरीरीं न कांहीं त्राण !
जीव होइ कासावीस । डोळ्यांत राहिला प्राण
भाजत्या धुळीवर तेथ । बाळ रडे पंचप्राण
तडफडतो तान्हा बाळ ।
पोटाशीं घेउनि जवळ ।
प्रार्थिते " प्रभो साम्भाळ "
परि क्रूर होइ घननीळ । मारिलें आइनें मूल

पाहुनी तियेचे हाल । जणुं पाझर हृदया फुटुन
धावला कुणी धर्मात्मा [ ! ] तो बसे जवळ जाऊन
दे धीर दीन गाइला । धीराचे वच बोलून
बाइ ! हा असा दुष्काळ ।
तुमचाच जीव व्याकूळ !

वांचवाल कैसें बाळ ?
तें हाय ! जाहलें मलुल" । मारिलें आइनें मूल

धीराच्या ऐकुनि गोष्टी । तो देवदूत तिज वाटे
परि दिसतें तैसें नसतें । सारेंच जगीं उफराटें !
सोनेरी सुन्दर सर्प । बाळगितो जहरी काटे !
तो वदे हळुच बाईला ।
" जरि जीव हवा तुम्हाला ।
" द्या मूठमाति बाळाला ।
" नोकरी तुम्हां लाभेल" । मारिलें आइनें मूल

" आमुचा धनी श्रीमन्त । नवप्रसूत त्याची पत्नी
" पाजण्यास त्याचें मूल । तूं रहा तेथ येवोनी
" तुज मिळेल खाया गोड । राहशी सुखानें सदनीं
" टाक हें मूल मारोनी ।
" जाशील ना तरी मरुनी ।
" वाली न मुला मग कोणी ।
" होतील तयाचे हाल" । मारिलें आइनें मूल

ऐकून वीषमय बोल । आंसवें सांठलीं नयनीं
जाहली बावरी मुद्रा । चित्ताचें होई पाणी
वाईट जिवाची आशा । घाबरून गेली जननी
आपुला जीव वांचावा ।
तान्हुला कुठें धाडावा ?
साङ्गेल जाउनी देवा—
" आई न, असे ही काळ" मारिलें आइनें मूल

इह जगांत सर्वांहून । प्राणाचें मोल अपार
जुम्पती तयास्तव युद्धें । रणकन्दन चाले घोर
प्राणाची आहुति देती । ते जगीं गाजती वीर
जगण्याची वेडी आशा ।
टाकून तिनें निजपाशा ।
मंजुळेस केलें स्ववशा ।
प्राणाचें प्रेम अमोल ! मारिलें आइनें मूल

निरपराध बालक हातीं । घेऊन पाहते माता
ते हंसरे चंचल डोळे । तिजकडेच बघती आतां
मुखचंद्र पाहुनी रम्य । विसरून जाय ती जगता
तों येई कर्कश वाणी ।
" बाई कां वेळ अजूनी ? "
तीव्र बोल घुमतां कानीं ।
अश्रुजलें न्हाणी बाळ । मारिलें आइनें मूल

" मज क्षमा करा देवानों ! " कांहींसें यापरि वदुनी
तें नाजुक निर्मल बाळ । एकदां हळू चुम्बोनी
करि निर्दय अन्तःकरण । डोळ्यांचें पुसुनी पाणी
नख लावुनिया नरडीला !
हाताचा फांसा केला ।
धाडिलें बाळ स्वर्गाला !
कुस्करिलें कोमल फूल । मारिलें आइनें मूल

निज अर्भक केलें ठार । जाळून मनाची माया
बंगल्यावरी ती गेली । श्रीमन्त बाळ पोसाया
पक्वान्न मिळालें खाया । नवनवीन कपडे ल्याया

मांडीवर घेउन मूल ।
ती बसली तेथ मलूल !
परक्याचें पाजित बाळ !
चित्तांत उठे कल्लोळ । मारिलें आइनें मूल

तान्हुलें लाडके माझें । मी कोल्ह्याकुत्र्यां दिधलें
जरि अंकीं असतें आज । तें असतें ऐसें प्यालें
मानेस घालुनी विळखा । " आई ऽ ग " असतें वदलें
हीं स्वप्नें दिसतां पुढतीं । चित्त तिचें भ्रमुनि गेलें
फेंकून दिलें तें बाळ—
तें होइ रक्तबम्बाळ !
बडबडे " बाळ ग ऽ बाळ " !
जगिं फिरें लागुनी खूळ ! मारिलें आइनें मूल !

[ मूळ कथानक कै० शि. म. परांजपे याचे गोष्टींतून घेतलें आहे. ]

पुणें : ता. १-११-३८ ] — उमाकुमार

## आकाश-दिवा : १६

' मग, मी जाऊ ना गावाला ? महिन्या पंधरा दिवसांनीं येईन परत. यंदा दिवाळीला आमच्या येथें पुष्कळ पाहुणे जमणार आहेत. मजेनें जाईल दिवाळी म्हणून म्हणते आपली–' वत्सला राजाच्या कोटावर ब्रश मारीत म्हणाली.

' तुझी दिवाळी मजेनें जाईल हें कबूल. पण मग आम्ही येथें एकट्यानीं काय करायचं !'

' मग तुम्हीही या कीं तीन दिवस सुटीत. वेळांत वेळ काढून जावई घरीं आल्याबद्दल सासऱ्यांना आनंदच होईल. पण तुम्हाला कुठें वाटतं आहे कीं, सासऱ्याला आनंद द्यावा म्हणून ! ' वत्सला हातांतील ब्रश भिरकावून देऊन तोऱ्यात म्हणाली.

' बच्छे ! तुला तर सर्व माहिती आहे. मला वेळ कसा मिळेल हें तूंच पहा. आणि समजा तीन चार दिवस तिकडे आलों, तर असं वाटतं एकदां खानदेशांत गेलो म्हणजे माझ्या दोन मित्रांना भेटून यावं – वेरूळचीं – व अजिंठ्याचीं लेणीं पहावीत व इतक्या

साऱ्या गोष्टी करायला तीन चार दिवस फारच अपुरे पडतात. म्हणून म्हणतो आपण दोघेही नाताळात गेलो तर नाहीं कां चालणार?' राजा सतरंजीवरुन उठून वत्सलेचा हात हातात घेत म्हणाला.

'तुम्ही आपलें प्रत्येक वेळा, माझ्या माहेरी जाण्याला मोडाच घालता. किती दिवसात गेले नाहीं मी! लग्नानंतर फक्त दोनच वेळा गेले. लग्नापूर्वीचा सारा जन्म आईवडिलाच्या संगतीत काढला–त्यांना सोडून कुठें गेले नाहीं मी. आता त्यांच्या पासून इतके दिवस लांब राहायला आमच्या जिवावर येतं. तुम्हीं आमच्या जागीं असता म्हणजे कळालं असतं–मग जाऊ ना मी ऽ–'

'अग! तूं माहेरी गेल्यावर माझे काय हाल होतील याची तुला कल्पना आहेना! संध्याकळीं घरीं परत आल्यावर, जर माझ्या डोळ्यांना हें नयनमनोहर गोजिरवाणं रूप दिसलं नाहीं, तर चुकल्या सारखं वाटतं. अन् आता तर तूं महिनाभर गांवाला जाणार. म्हणजे एकूण आम्हाला हा येता पाडवा तूं ओवाळणी शिवाय काढायला लावणार तर?'

'मला ह्या पाळीला जाऊं द्या—मी पुनः कध्धी तुम्हाला सोडून जाणार नाहीं. आमचा मेला जीव दोन्हीहीकडे टागतो. आहे ना मग परवानगी –' वत्सला लाडीकपणे त्याच्या केसावरून हात फिरवीत म्हणाली.

'ही हाताची नाजूक जादूची कांडी आमच्या डोक्यावरून फिरविली, आणि ह्या डोळ्यांनीं नजर बंदी केली म्हणजे आमचं डोकं मुळीं ठिकाणावर राहातच नाहीं. आणि खरंच तुझ्या सहवासात इतकी जादू भरली आहे म्हणूनच तुला सोडावसं वाटत नाहीं. एकूण मला ही दिवाळी पुस्तकांच्या व मासिकाच्या संगतीतच काढावी लागणार तर— ?

'कां बरं! आणखी एक वस्तू आहे कीं आपल्याला सोबत.'

'कोणती?'

'आपल्या टेबलावरची, आवडती वत्सला!"

'नुसती चित्रातलीच किनई—'

‘ पण किती झालं तरी ती आपल्या लाडक्या वत्सलेचीच प्रतिमा आहे ना !

‘ आहे कबूल ! पण पुढे येणाऱ्या प्रतीमेपेक्षां ही कांहीं ऽ —

‘ इश्श्—भलतंच......’

* * *

वत्सलेला गावाला जाऊन तीन चार दिवस झाले नाहींत तोच, राजाला करमेनासं झालं. घरीं परत आल्यावर त्याला त्याची खोली, स्वयंपाकघर—गॅलरी–सारीं वत्सले वाचून सुनी भासूं लागली. दोन्ही वेळेला खानावळीतून डबा यायचा. व तो डबा पोऱ्यानें आणलेला पाहिल्या बरोबर, याचं पित्त भडकायचं. पुनः कॉलेजची वकिली परीक्षा पास होईपर्यंतची सहावर्षे त्याच्या डोळयासमोर यायची. “ खानावळीच्या अन्नावर हा पिण्ड पोसला ! ” वत्सलेशी लग्न झाल्याबरोबर त्याला जास्त आनंद जर कशात झाला असेल तर त्या खानावळीतल्या डब्याला आपण आता अंतरलो याबद्दल. वीट आला होता त्याचा त्याला. अन् लग्न झाल्यावरसुद्धां आतां हा प्रसग यावा अं—!

कोपऱ्यात कॉफीचा डबा, चहा साखरेचा डबा–स्टोव्ह–भांडीं सारी धूळ खात पडलीं होतीं. कोण करणार त्या साधनाचा उपयोग ! राजाला स्वतः हातानीं चहा करण्याचा आधीच कंटाळा. आणि आतां एकटया जीवाला त्याची मुळीच जरूर भासत नव्हती. तो आपला चहा हॉटेलमध्यें जाऊन घेत असे.

शाळेतून मास्तरकी करून आल्यावर, एकटाच तो पलंगावर पडायचा. आणि पलंगावर पडल्यावर तासन् तास आपल्या लाडक्या जीवाच्या तजविरीकडे पहात रहायचा.

तो ज्या वाडयांत रहात होता, त्याच वाडयांत आणखी दोन सुखवस्तू ब्राह्मणाची बिऱ्हाडें होतीं. त्या वाडयांत मुलांची सख्या बेताचीच असल्यानें गोंगाट असा फारसा कधीं होतच नसे. पण होत्या नव्हत्या त्या चार मुलांत देशपाडयांचा भाल जरा जास्त अधीक अन् बोलका.

अन् बोलकीं मुलं राजाला नेहमींच आवडत. भालूची आणि राजाची ह्या त्याच्या रिकामपणामुळे जास्त ओळख झाली.

एके दिवशीं असाच राजा वत्सलेचा फोटो हातांत घेऊन त्याकडे पहात आरामखुर्चीवर बसला होता. इतक्यात भालू अर्धी पँट आणि पांढरा शुभ्र अर्ध्या बाह्याचा सदरा घालून आला व राजाच्या जवळ जाऊन म्हणाला—

' मास्तर—'

' कोण भालू–कुणीकडे आलास रे !—'

' मास्तर, काकूचा फोटो वाटतं हां ! अन् त्या कुठें दिसत नाहींत ? –गावाला गेल्या वाटतं—'

' हो—'

'–मग तुम्ही नाहीं गेलात.. तुम्हाला आवडतं एकटं राहणं ?–' व आपण काहीं तरीच बोललो असं वाटून भालूनें तोंड फिरवून जीभ चावली. ' चल भाल्या–आपण आता कॉफी घेवूं–त्या शेजारच्या हॉटेलवाल्याला सागून ये जा पाहू.—'

' पण माझं आधीं एक काम कराल कां ? तर मी जाईन सागायला–नाहीं तर—'

' काय काम आहे—'

' मला किनई एक आकाश दिवा करून द्या. परवापासून दिवाळी आहे ना–'

' काय म्हणालास–आकाशदिवा–बरजांऽ—'

भालू कॉफीची ऑर्डर द्यायला अगदीं हंसत खेळत निघून गेला.

राजा खुर्चीवर बसला, व एक सिगारेट पेटवून ती मधून निघालेल्या धुराच्या वर्तुळाकडे तो पहात राहिला. त्या धुराचीं वलयें हवेत इकडे तिकडे तरंगत चाललीं होतीं. त्या तरंगत जाणाऱ्या वलयाकडे पाहून त्याला वाटलं, आपल्या कल्पनाही अशाच हवेत विरून गेल्या. ह्या दिवाळीच्या सुटींत वत्सलेला बरोबर घेवून सिनेमाला जावं,फिरायला जावं, हे खरेदी कराव-तसल्या प्रकारचा विनोद करावा, तिच्या आवडीच्या वस्तू तिला न कळत बक्षीस द्यावयाच्या

आणि मग ती ती वस्तू पाहून खूप झाल्यावर आपल्या मानेला एक नाजूकसा मुरका देत, व त्या मानेच्या लचकयाबरोबर पाठी-वर स्वैरपणें रुळणारा शेपटा हातांत घेवून ' मला कळवलें नाहींना आधीं; आम्ही नाहीं तुमच्याशी बोलणार आतां—' आणि असलेंच कांहीं तरी लाडीक शब्द तिच्या नाजूकशा ओंठातून निघाल्या बरो-बर, आपण तिला वगैरे वगैरे—

आणि असे विचार त्याच्या मनांत आल्याबरोबर खरोखर त्यानें तिला गाढ अलिंगन देण्यासाठीं हात पुढें केलेहि पण इत-क्यांत दरवाजा उघडला गेला, व भालू कॉफीवाल्या पोऱ्याला बरो-बर घेवून आला.

कॉफी घेवून झाल्यावर, भालूनें त्याच्यापुढें चार कामट्या आकाश दिवा करण्यासाठीं टाकल्या.

त्यानें एक आकाश दिवा भालूला करून दिला. आणि भालू-साठीं त्यानें आणखी दोन दिवे त्याच्या मित्राना करून दिले.

ह्यांत त्याचा बराच वेळ गेला. व आता तर सुटी लागल्यामुळें त्याला अगदींच करमेनासे झाले. ह्या मुलांशीं गप्पा मारण्यांत व त्याना आकाश दिवा करून देण्यांत आपला बराच वेळ जाईल —व अशीच सुटी निघून गेल्यावर—मग मग काय—मग येईलच वत्सला ! या विचाराच्या आसपासचा वेळ पुस्तकें मासिकें वाचून तो घालवू लागला.

आपली सुटी आनंदात जाण्यासाठीं त्यानें ह्या निर्जीव कार्य-क्रमांत आपल्याला गुरफटून घेतलं होतं. ह्या कामाच्या दंगलींत आपल्याला वत्सलेची उणीव विशेष भासणार नाहीं असं त्याला वाटलं. पण शेवटीं हें वाटणं वाटणंच ठरलं—

एके दिवशीं दुपारीं—'स्त्री'चा अंक वाचीत असतांना—पोष्टमननें एक पत्र आणून दिलं. त्यानें लगेच तें फोडलं व वाचण्यास आरंभ केला.

बऱ्हाणपूर—
ता. १५-१०-३८

प्रिय राजेसाहेब,

आम्ही सर्व मंडळी जळगांवांहून अशीरगडला जाण्यासाठीं निघालों. परवाच तो किल्ला आम्हीं पाहून आलो. खरोखरच किल्ला फार पहाण्यासारखा आहे. तेथें खूप गंमत केली आम्ही. आमच्या नवीन वहीनीचा भाऊहि आमच्याबरोबर होता. बोलून फारच मोकळा आहे तो; त्याची व माझी बरीच मैत्री जमली. आम्ही खूप बोललो. मला तुमची कित्ती आठवण होते म्हणून सागू! असें वाटलें कीं, जावे नि यावें घेऊन तुम्हाला. परवा मी तुमच्या आवडीचें तें काळें जरीचें पातळ नेसलें होतें. इतकी सुंदर दिसत होतें मी! पण त्या सौंदर्याची वाखाणणी करणारे माणूस माझ्यापाशी नव्हतें. मनानें तुम्हाला तर जवळ ठेवलें होतेंच, पण प्रत्यक्ष तसे असावेत असे फारफार वाटले. पण...बाकी सर्व ठीक आहे.

तुमची लाडकी
सौ. वत्सला.

राजानें पत्र वाचलें—व त्याची कशी तरी घडी करून तें टेबलावर ठेवलें व तो ग्यालरीत येऊन उभा राहिला.

समोरच्या वाड्यातील दोन सुंदर मुली—एकीनें काळें जरीचें पातळ नेसले असून डोक्यांत एकच गुलाबाच फूल खोवलं होतं व दुसरीनें इरकली टोपपदरी हिरवं लुगडें नेसलें होते व अंबाड्यावर गजरा लावला होता. त्या नणंद भावजया होत्या असें त्याला तपासाअंतीं कळलं. दोघीही जणी अंगणात रागोळी काढण्यात चूर झाल्या होत्या. जणुकाय प्रत्येकजण आपापली रागोळी आपल्या सारखीच दिसावी असा प्रयत्न करीत होती.

सहज त्याचं रस्त्यावर लक्ष गेलं. एक नवीन तरुण जोडपं मोठ्या ऐटींत व आनंदांत फिरायला चाललेलें त्याला दिसलें.

ह्या साऱ्या गोष्टी पाहून त्याला वत्सलेची जास्तच आठवण झाली. तो घरांत गेला.

खुर्चीवर न बसतां, त्यानें सतरंजीवर खालीं आंग टाकलें तोंच त्याला जवळील खिडकींतून शेजारचे शब्द ऐकूं आले—

‘ अग–अक्काचे यजमान येणार आहेत दिवाळीला. तर करंजा, लाडू काहीं तरी करून ठेव—’

आजूबाजूचे प्रत्येक दृश्य त्याला वत्सलेची आठवण करून देत होते. आणि वत्सलेचें पत्र वाचून मात्र–त्याला वाटलं तिच्या विरहामुळें आपल्यालाच तेवढा मानसिक त्रास होत आहे, आणि ती मात्र आनंदात फिरत राहिली आहे. ती येथें येणें शक्य नाहीं म्हणून काय आपण अशीच दिवाळी काढावी. तिनें मात्र आनदानें दिवाळीचे इकडे तिकडे बागडावें व आपण मात्र ती जवळ नाहीं म्हणून मन खट्टू करून तजबिरीकडे व इतर लोकाच्या सुखाकडे पाहून वेळ काढावा! तिला जर आपल्याशिवाय दिवाळीची सुटी आनंदानें घालविता येते तर आपल्याला कां येऊ नये?

ह्या विचाराच्या तंद्रीतून त्याला भालूनें जागें केलें. तों धांवतच राजाजवळ आला व म्हणाला ‘ मास्तर–आमची अक्का आज नागपूरहून आली आहे. ती किनई–खूप खूप शिकली आहे–इंटर झाली आहे. तिनें मला विचारलं कीं, हा दिवा कुणी करून दिला. मी तुमचं नाव सांगितलं. तिला फार फार आवडला तो. तिला मी तुमच्याकडे घेऊन येणार आहे. येऊं कां घेऊन?” हे सारे शब्द तो इतक्या भरकन बोलला, कीं आपण ही आनंदाची बातमी राजाला केव्हां येऊन सांगतो आणि केव्हां नाहीं. अस त्याला झालं होतं.

राजाची व अक्काची चांगलीच ओळख झाली. रोज सकाळीं व संध्याकाळीं ते तिघे मिळून एकदां राजाकडे तर एकदां भालूकडे चहा घेत असायचे.

ह्या दोघाच्या सहवासांत–विशेषतः भालूच्या अक्काच्या सहवासांत राजाचा वेळ मजेत जाऊ लागला.

एके दिवशीं राजानें खूप फटाके व फुलबाजा आणल्या व त्या भालूला व वाड्यांतील मुलाना उडविण्यासाठीं दिल्या.

मुलं म्हणायला लागली 'मास्तर छान आहेत.' दुसऱ्या दिवशीं त्यानें, हॉटेलमधून फराळाचें आणलें व वाडयातील मुलांना दिवाळी निमित्त खायला बोलावून त्यांना दिलें. तेथें त्या दिवशीं भालूची अक्काही फराळाला होतीच.

सर्वांचा फराळ झाल्यावर, त्याच्या टेबलावर पडलेलें एक फूल अक्कानें उचललें व आपल्या अंबाडयात खोवलें.

राजाला समाधान वाटलें.

इतक्यांत, गडयानें ' आक्कासाहेब, तुम्हांला विनायकरावांनीं बोलाविलं आहे !–" म्हणून सांगितलें, भालू व आक्का निघून गेली.

तो एकटाच पुनः वत्सलेच्या तसबिरीकडे पहात पडून राहिला.

थोडया वेळानें, भालूनें ' विनायकराव, अक्का व आपण सिनेमाला जाऊं तर तुम्ही तयार रहा—' म्हणून सांगितलें.

' विनायकराव कोण रे--' राजानें विचारलें. ' म्हणजे तुम्हांला माहीत नाहीं ! ते आमच्या अक्काचे हे—' येवढं बोलून तो तेथून पळालाच.

राजा ह्या आठवडयांत घडलेल्या गोष्टींचा विचार करू लागला. त्याला त्याचच आश्चर्य वाटायला लागलें. पण ते विचार पूर्ण होण्यापूर्वींच, अक्का, विनायकराव नि भालू त्याच्या पुढें सिनेमाला जाण्यासाठीं दत्त म्हणून उभे.

ते सर्व सिनेमाला जाण्यासाठीं निघाले. विनायकराव काठी विसरले होते, ती आणण्यासाठीं आंत गेले, व त्यांच्या मागेंच भालू ही पळाला. ' तुम्ही जिना उतरा मी येतोंच ' असें सांगून विनायकराव घरांत गेले होते.

राजा व अक्का दोघेंही बरोबरच जिना उतरलीं, व ओटयावर विनायकरावांची वाट पहात दोघेजण उभे राहिले.

पण इतक्यांत दारांत टांगा उभा राहिला व त्यांतून वत्सला उतरली.

राजाला आश्चर्य वाटलं.

वत्सलेला वाटलं हें काय ? ही कोण बरोबर ! व किंचित् मत्सर व आश्चर्य ह्या मनःस्थितींत तिनें टांग्यातून सामान काढलें.

राजानें एका हातांत बॅग घेतली व दोघेही जिना चढून वर गेले.

सामान जमिनीवर टाकलें व वत्सला राजाकडे साशंक नजरेनें तर राजा आश्चर्यानें तिच्याकडे पहात राहिला.

‘ तूं कशी आलीस परत इतक्या लवकर—आणि पत्र नाहींस पाठविलं तें—’

‘ म्हणजे—मला वाटलं तुम्हाला बरं नसेल. कारण मी गेल्या-पासून आपण एकही पत्र पाठविल नाहीं——बाकी कशाला येईल म्हणा पत्राची आठवण ’—वत्सला जरा रागानेंच म्हणाली.—

‘ खरंच वत्सला—तुझी किती आठवण येत होती म्हणून सांगू.’

‘ आणखीं दुसरही एक खरं कारण सांगू. मी अशीरगडचा किल्ला पाहिला——लेणीं पाहिलीं- तें पाहून मला आनंद झाला. अजिंठ्याला भिंतीवर आणि वरच्या छतावर रंगविलेलीं चित्रं पाहून मन थक्क झालं. त्या चित्रकारांनीं आपल्या कलेनें आज कित्येक वर्षं तीं लेण्यांतील चित्रें पाहणाऱ्यांना मोहिनी घातली, पण मला तीं चित्रें पहात-असताना वाटलं, कीं मलाहि मोहिनी घालणारा चित्रकार जवळ असावा. मला त्यावेळेस तुमची फार आठवण झाली व मनाला वाटायला लागलं—‘ तू अगदीं सहज मजेनें ही वेळ घालविते आहे —अन् तुझ्या राजाला मात्र वेळ मजेनें जात नाहीं म्हणून कंटाळा येतो आहे. खानावळींतील डब्यांतल अन्न खाव लागत आहे—आणखी खूप खूप वाटल——” आणि मग मात्र मला अगदीं तेथें राहवेना. मी दादापाशीं जाण्याचा हट्ट धरला व आले लगेच निघून.’

तिचं हें कारण ऐकल्यावर त्यानेंही आपला गेल्या आठवड्यातील जीवनक्रम सांगितला.

वत्सलेनें चहा केला. दोघांनीही तो घेतला. आणि तो चहा बरोबर घेतल्यानंतर, व राजानें सांगितलेली हकीकत ऐकल्यानंतर तिच्या मनांतलें टांग्यातून उतरल्या बरोबरचें वादळ शांत झालें.

तिनें दिवा लावला. व ती दोघेही, संध्याकाळची मजा पाहण्या-साठीं बाहेर आली.

गॅलरींत आल्यावर तिला तेथें आकाश-दिवा दिसला.

'कुणी केला हा?' तिनें हंसत मुखानें विचारलें.

'मी' आकाश दिव्याच्या कागदाच्या शेपट्यांशीं खेळत तो म्हणाला.

'मग यात मी आतां पंती लावून आणून ठेवतें.' असं म्हणून ती घरात पळाली व लावलेली पंती घेऊन बाहेर आली.

ती पंती त्या कंदीलाच्या आतल्या चौकटीत तिनें बरोबर ठेविली.

त्या पंतीच्या उजेडामुळे, निराळ्या रंगाच्या कागदानें त्या कंदीलाच्या वरच्या व खालच्या पुळक्याच्या मधल्या बाजूला झकवलेलीं I love you ह्या अक्षरांवर, प्रकाश पडला.

—आणि त्या प्रकाश पडून स्पष्ट दिसूं लागलेल्या I love you ह्या अक्षराकडे, तीं दोघेहीं पहात राहिलीं.

— मो. द. ब्रह्मे, अमळनेर.

# खाणींतील दोन रत्नें : १७

## १ स्वप्न नौका

मी सागराच्या किनाऱ्यावर उभा होतों.

माझी नौका सुवर्णाच्या शोधासाठीं निघाली होती. मजपासून दूर दूर जाणाऱ्या नौकेकडे पाहात मी उभा होतों. हंसाच्या डौलानें माझी नौका पाणी कापीत क्षितिजाकडे चालली होती. हळू हळू अस्पष्ट होत होत तिनें क्षितिजाची रेषा ओलांडली !

माझं अन्तःकरण गुदमरून गेलं होतं ! मी एक दीर्घ निश्वास सोडला नि मागें तोण्ड फिरवलं. तूं मला बिलगून उभी होतीस. मी तुझ्या खांद्यावर हात ठेऊन म्हणालें—"नौका परतेपर्यंत थाम्बूं या आपण हं ! मग कितीतरी सुवर्ण मिळेल आपल्याला !"

मावळत्या प्रकाशात निस्तब्ध उत्सुकतेनें मी नौकेची मार्गप्रतीक्षा करीत होतों. पण क्षितिजाआडून नौका डोकावली नाहीं. क्षितिजा-पलीकडे अफाट निळ्या सागरलाटांवर कुठे तरी माझ्या आशा

हेलकावे खात होत्या ! तूं माझ्या गळ्यांत हात घालून आर्त होऊन म्हणालीस, " नौका परत येईपर्यंत कशाला वाट पाह्यची ? मला फक्त तूं पाहिजेस, सुवर्ण नको. "

मी खिन्नपणें हसलों नि तुझे हात गळ्यापासून दूर केले. दुःखानें तूं माझ्यापासून दूर गेलीस. तुझें मस्तक नि हात गळून गेले होते. तूं मटकन खालीं बसलीस. मी तुझ्याकडे धावणार तोंच क्षितिजावर नौका चमकूं लागली. प्रदीर्घ रात्रीनंतर उगवलेल्या सूर्यप्रकाशांत माझी नौका डोलत होती. हर्षभरित होऊन मी तुला एकामागून एक हाका मारल्या; पण तूं मजकडे पाठ फिरवून दूर दूर चालली होतीस ! सर्व बल एकवटून मी हाक मारली पण तुला ती ऐकू गेली नसावी. प्रतिक्षणाला जवळ येणारी नौका तुझ्यासाठीं सुवर्ण आणीत होती; पण तुला त्यांतील कांहींच नको होतें.

मी सागराकडे पाहिलं; तो आतां फेसाळत होता. लाटा किनाऱ्याशीं हुतुतूचा खेळ खेळत होत्या. सुवर्णानें भारावलेली नौका अधिकाधिक स्पष्ट होत होती तर तुझी सुन्दर आकृति हळू हळू अस्पष्ट होत होती.

सागरपक्षीं नौकेच्या शिडावर बसण्यास गर्दी करीत होते. माझ्या हृदयाच्या पिंजऱ्यांतून माझे प्राण उडून जात होते. माझ्याकडे येणारी सुवर्ण–नौका माझें हृदय ओढूं शकत नव्हती.

तूं माझ्या गळ्यांत हात घातलेस तेव्हां सुवर्णाच्या मोहानें मी ते दूर केले. आतां मी तुजकडे बाहू पसरून उभा आहें: पण तूं माझा त्याग करून दूर दूर गेली आहेस.

आणि माझं हृदयं आक्रोश करीत आहे—

" माझी नौका ! माझी नौका ! ! "

## २ माझी वीणा

माझी वीणा !
माझ्या जीवनाची संगीत–साधना !
किती गोड आहे माझी वीणा !

तिला हळूवार स्पर्श करतांच तीमधून भावसंगीताचे मधुर सूर स्पन्दन पावू लागतात !

जीवनसंगीतानें पूर्ण भरली आहे माझी वीणा !

ज्या वृक्षापासून तिचा जन्म झाला तो वृक्ष अनन्तकाळ निबिड अरण्यांत उभा असेल ! जन्मापासून त्याची काया प्रतिक्षणाला वनातील विविध संगीतलहरींनीं पुलकित झाली असेल ! वादळ, सागर, सरितेचा प्रवाह, निर्झराचे प्रपात याचे नाद त्यानें श्रवण केले असतील !

निसर्गाच्या संगीतांत तो लहानाचा मोठा झाला असेल.

त्यानेंच माझ्या वीणेला जन्म दिला असेल !

वायुवीचीचें मन्द संगीत, कोकिळाचे मधुरालाप, मेघसिंहांची गंभीर गर्जना, पर्जन्याच्या सहस्रधाराचे तालबद्ध नृत्य या साऱ्या ध्वनींनीं माझ्या वीणेचा कण न् कण भारला आहे.

मी तिच्यावरून बोटें फिरवितांच ती प्रेमगीत गाऊं लागते !

कुणी बर तिला हें प्रेमगीत शिकविलं असेल ?

मला वाटतं त्या वनांत घडलेली प्रेमकथा तिनें अवलोकन केली असावी, नाहीं तर मी स्पर्श करताच मला अज्ञात असें प्रेमगीत तिच्यातून घुमतेंच ना !

तिच्यांतून निघणाऱ्या प्रेमगीताच्या परिमलानें सारें वातावरण धुन्द होऊन जातें !

सारे कुविचार कुठल्या कुठें लोपून जातात !

सारे जीव प्रेमसंगीतानें डोलू लागतात !

अशी मोलाची नि नवलाची आहे माझी वीणा !

—शशाङ्क.

## पडद्याआड— : १८

कॉलेजमध्यें त्यानें पहिल्या दिवशी जें पाऊल टाकले तें अशा निश्चयानें कीं, कुठल्याही मुलीशीं कोणत्याही कारणावरून बोलायचें अथवा त्याच्याकडे पहायचें नाहीं.

या त्याच्या बेताची वाच्यता त्यानें कोणत्याच मित्राजवळ केली नव्हती. किंवा अशा प्रकारची निकट चर्चा करण्याचें स्वभावांतील लाघवही त्याच्याजवळ नव्हतें. अगदीं सरळ कोरडा माणूस. पण एक दिवस काय झालें कुणास ठाऊक. चुकून त्याच्या तोंडांतून हीं संन्यासी मतें बाहेर पडली. प्राध्यापकाच्या गाऊनवरचा शाईचा डागसुद्धां ज्यांच्या टिंगलीतून सुटत नाहीं अशीं कॉलेजचीं मुलें तीं! एकजण म्हणाला "मग हें पोर येतं तरी कशाला कॉलेजांत! आग्र्याला जाऊन ताजमहाल पहायला विसरायचं म्हणजे काय?" दुसऱ्या एकानें 'शंका' काढली "अरे तो अभ्यास करायला कॉलेजांत येत असावा."

शेषशायी कवि म्हणाले, "अहो, तारुण्याच्या जीवनपौर्णिमेत

आकाशांतल्या (चटक) चांदण्या पाह्यच्या नाहींत तर तर काय 'चंद्रावरचीं हरणं म्हणजे डोंगरच किंवा काय' याची चर्चा करत बसायचं? मी म्हणतों चंद्रावर हरणं असतील नाहीं तर माकडं असतील, अहो तुम्ही आपलें या हरिणाक्षींच्याकडे बघा कीं—"

पण त्याचें या सगळ्याकडे बिलकूल लक्ष नसें. अकराला अवघीं तीनच मिनिटें असतांना तो व्हराड्यांत न थांबतां वर्गात जायचा. त्यानें तिसऱ्याच काय पण चवथ्या बाकावर बसण्याचें धाडसही कधीं केलें नाहीं. तास चालू झाला कीं याची मान वर प्राध्यापकाकडे अथवा खालीं वहीकडे. मध्यें दृष्टीचा काटकोन सहजगत्या जरी एकाद्या पाठमोऱ्या मुलीच्या डोक्यांतल्या हिरव्या चाफ्याकडे गेला तरी याची नजर एकाद्या महान् अपराध्यासारखी कावरीबावरी होई.

या बाबतींत त्याचें असें कां होई हें त्याला उमजत नसें. एक तर त्यानें मनाशीं पक्के ठरवून टाकलें होतें कीं आपल्याला जगांत जर काहीं करावयाचे असेल तर मुलींशीं आणि त्यातल्यात्यांत कॉलेजातल्या मुलींशीं संगत न ठेवलेली बरी. आणि त्याप्रमाणें त्यानें आपली बाहेरच्या जगातली प्रगतीही उत्तम चालवली होती. पण बाहेरच्या जगात पाहिजे तेथें प्रकट होणारा निर्भय बाणेदारपणा इथं कुठं नाहींसा होतो हेंच त्याला उमजेनासें झाले होतें.

म्हणजे त्याचें असें झालें होतें कीं, प्रथम त्यानें मुलींच्याविषयीं आपल्या सोयीसाठींच भीतीच्या कल्पना मनात रुजवून घेतल्या होत्या. आणि पुढें न कळत त्याच कल्पनाची भीति त्याच्या मनांत ठाणं देऊन बसली होती. शिवाय त्याचे सारें शिक्षणही एका मुलांच्याच शाळेंत झालें होतें कीं जेथें झाडूवालीशिवाय एकही स्त्री त्यानें त्यानें पाहिली नव्हती. त्याला आई नव्हतीच आणि बहिणींशीं सुद्धां तो फक्त घरींच बोले. त्यांच्याबरोबर बाहेर जाणें तर दूरच पण त्या कुठें बाहेर भेटल्या तर त्यांच्याशीं नुसतें बोलायची त्याची तयारी नव्हती.

तो कपडे व्यवस्थित घाली. त्याचा त्याला थोडा शोकही होता आणि तो भागवणें त्याला शक्य होतें. व्हरांड्यांतून जातांना त्याच्या

बाजूनें मुली जात तें त्याला चटकन् कळे. आंधळ्या माणसाला देवानें कर्णेंद्रियें अतिशय तीक्ष्ण दिलेलीं असतात आणि त्यामुळें त्याला आवाजावरूनच माणसें कळतात म्हणतात. तसेंच त्याचें झालें होतें. मागे मुली असल्या तरीसुद्धा तें त्याला कळे व तो सावध होई. मुलींच्या बाबतींत तो आंधळाच झाला होता म्हणाना! आकाशात सोसाट्याचा वारा झाल्यावर मेघाचे थवेच्या थवे अंतराळात कुठें नाहीसें होतात तसें सुटी झाल्यावर मुलींचे थवेच्या थवे किलबिल किलबिल करीत त्याच्याजवळून एका विशिष्ट दिशेनें एका खोलीकडे नाहींसे होत. आणि तिकडे गेल्यावर त्याची मोठी गडबड सुरू झालेलीही त्याच्या लक्षात येई. त्यावरून, आकाशांत जातांना वाफ अगदीं गडबड न करतां जाते पण तिथे पोहोंचल्यावर मात्र ढगाच्या रूपानें तिचा जो गडगडाट होतो त्याची त्याला आठवण येई.

असे एक दोन महिने गेले. त्यानंतर मात्र त्यानें मुलींशीं (अथवा मुलींनीं त्याच्याशीं) बोलण्याचा प्रसंग एकदाच आला, संमेलनाच्या निवडणुकीचे ते दिवस होते. एक दिवस त्याला एका अनोळखी मुलानें हटकलें "अहो मि. ऽ कोण बरं तुम्ही?"

"मीच कां?" त्यानें विचारलें.

"हो. तुम्ही तापी व्हॅली रेल्वेवर प्रवास करीत असता मला भेटला होता नाहीं? हं ऽ बरं माझं तुमच्याकडे एक काम होतं. येत्या निवडणुकीमध्यें—"

त्यानें तापी व्हॅलीवर कधीं प्रवास केला नव्हता पण त्याला तें बोलणें ऐकून एकदम बनारस अलहाबादच्या पंड्याची आठवण झाली. ज्याप्रमाणें यात्रेच्या वेळीं कोणाचेंही नाव याच्या यादींत सांपडावयाचें, तसेंच निवडणुकीमध्यें वाटेल त्या माणसांजवळ आपली ओळख निघूं शकते.

तो मुलगा पुढें म्हणाला, "येत्या निवडणुकीमध्यें सुशिला गोळे म्हणून उभ्या आहेत—"

"कशासाठीं उभ्या आहेत या सुशीलाबाई?"

त्याच क्षणीं तिकडून चालत येणाऱ्या दोन मुलींपैकीं एकजण थबकून म्हणाली " अहो, मी कुणी बाई नाहीं म्हटलं. माझं नांव कुमारी सुशिला गोळे आहे " त्या बिचाऱ्याच्या पोटांत गोळाच उठला. त्याची मान मात्र खालींच होती.

तिनें आजूबाजूला पाहून विचारलें, " तुम्ही कोणच्या पक्षाचे नाहीं ना ?"

" म्हणजे तूंच कां—? "

" अहो, जरा ' अहो जाहो ' म्हणा कीं, मागचे चार पांच गोळे पक्षी ओरडले.

" हे पहा " त्याच्या समोरून आवाज आला " तुम्हीं कोणाला वचन दिले नाहीं ना ? "

" अं हं ! "

'–Then you can vote and canvass for me ' तिनें कार्डांचा जुडगा पुढें केला व तो त्यानें घेतला.

दुसऱ्या एका प्रसगीं एका मुलीचा त्याच्याविषयीं गैरसमज झाला होता. ( कधीं कधीं कॉलेजांतलें गैरसमज पुढें ' चागला समज ' होण्यासाठी इष्ट (!) मित्रमैत्रिणी पसरवून देत असतात. ) इथें बोलण्याचा प्रसग मात्र आला नाहीं.

* * * * *

सुदैवानें अथवा दुर्दैवानें कॉलेजांतल्या दोन तीन प्राध्यापकांचा त्याच्यावर लोभ जडला होता. ते त्याला पुष्कळ प्रसगीं प्राध्यापकांच्या खोलींत बोलावीत. आणि अगदीं नाइलाजानें त्याला तिकडे जावें लागे ' विद्यार्थिनींचीं खोली ' तिथून अगदीं जवळ असल्यानें त्याचा जीव अगदीं घामाघूम होऊन जाई. त्याच्या बहिणी कॉलेजांत आल्याशिवाय इकडे येण्याचा प्रसग त्याच्यावर जन्मांत कधीं आला नसता. ( तेव्हां तरी तो गेला असता कीं नाहीं शकाच आहे. ) त्याच्या वर्गांतल्या एका मुलाच्या दोन बहिणी कॉलेजांत होत्या, त्या वैभवाचा त्याला मोठा अभिमान वाटे. आणि हे वैभवचिन्ह आपल्या नकट्या नाकाच्या नाकपुडया फुगवून तो नेहमीं मिरवी.

या प्रकारानें स्त्रिया आणि ‘ विद्यार्थिनींची खोली ’ यांच्याविषयीं त्याची कल्पना आणखीच उच्च झाली. तेथल्या सुखाची आणि आनंदाची कल्पना त्यानें स्वर्गासारखीच केली होती आणि तो दोन बहिणीवाला मित्र त्या खोलीशीं आल्यावर त्याचा मुखडा जो ‘स्वर्ग दोन बोटें उरल्यासारखा ’ होई त्यावरून त्याला आपल्या कल्पनेची निश्चिती पटे.

अगदीं नकळत त्याच्या मनात तें कुतूहल रुजत गेलें. त्याच्या भीरु मनाला एकदा प्रचंड धाडस करून आपली शंका फेडून घ्यावी असें वाटू लागलें. पण त्याला तें सहज साध्य नव्हतें. कारण ? —मधला पडदा.

त्याला भारी चीड आली त्या पडद्याची. त्याच्या मनात चुकून कल्पना यायला आणि पडद्याचं अरिष्ट लक्षात यायला एक गाठ पडली. रागानें त्याच्या मनात अशीही एक गंभीर कल्पना चमकून गेली, कीं आपला हिंदु–समाज भारी वाईट आहे. जन्मभर तो स्त्रिया आणि पुरुष याच्यामध्यें या ना त्या प्रकारानें पडदा ठेवतो, कीं जो पडदा फक्त लग्नाच्या वेळींच अवघा दोन सेकंदच दूर होतो.

पण या तत्त्वज्ञानाचा उपयोग नव्हता. इच्छेला वाट तर पाहिजे होती आणि कांहीं असलें तरी त्यासाठीं एखाद्या मुलीच्या ओळखीची जरूर नव्हती. तिथेंच बाधा होता. त्याचो इच्छापूर्ति त्या खोलीच्या दरवाजात पडदा आड आल्यामुळें तहकूब करणें भाग होतें, तर मुली बाहेर असताना त्याच्या स्वत:च्याच आड–पडद्यामुळें तें अशक्य होतें.

त्यानें आपल्या कल्पनांच्या साम्राज्यांत स्त्रियांना कांहींतरी अमानुष महत्त्व दिलें होतें. अथवा त्याला न कळत दिलें जात जाऊन बनलें होतें. त्या जातीविषयीं फारच उच्च कल्पना त्यानें निर्माण केल्या होत्या. थोडक्यांत, ह्या मुलीचे संबंध त्यानें स्वत:च इतके दूर केले होते कीं शेवटीं त्याला ते ‘ दूरचे डोंगर साजरे ’ दिसायला लागले होते.

शेवटीं एक दिवस त्यानें कुतूहलाच्या आत डोकावून पहायचें ठरविलेंच. त्या दिवशीं सुदैवानें तर्कशास्त्राच्या प्राध्यापकानीं माडीवरील खोलींत त्याला बोलावले होते. रात्री ज्या घरीं चोरी करायची त्या घरीं दिवसा टेहळणी करणारे चोर ज्या धाकधुकीनें त्या घराशीं हिंडत असतील, त्याच मुद्रेनें तो अकरा वाजल्यापासून वावरत होता. जणू काय त्याच्या मनातले विचारच लोक त्याच्या तोंडावर वाचणार होते ! दीड वाजता सुट्टी झाली. रोजच्यापेक्षांही खालीं मान घालून अगदीं हळू हळू तो प्राध्यापकांकडे जात होता. इकडे मुलें जवळ जवळ नव्हतींच. आणि खोलीजवळ मुलीही फारशा नव्हत्या. सगळ्या आत गेलेल्या दिसत होत्या. तो प्राध्यापकाच्या खोलीपाशीं गुटमळत उभा राहिला; कारण महादू गडीही कुठें तरी गेला होता. इतक्यांत—' प्रथमग्रासे मक्षिकापात: ' ! समोर तो आपला दोन वहिणीवाला मुलगा हजर. तो लगेच पुढें झाला आणि ' आपल्याच गल्लीत ' असल्याच्या आवाजात खोचून म्हणाला " काय हो मुलींचीं तोंडे बघायला हिंडता आहा काय ? "

तो कांही उत्तर देण्याच्या आधी मागे उभे असलेले प्राध्यापकच त्याच्या मदतीला धावले. " कोण रे तू ! तुला काय कॉलेजनें काळू-ऐवजीं गोपातला गडी नेमला आहे काय ! ऑं ? " आपले डोळे चष्माच्या भिंगाकडे रोखून आपली तोकडी विजार सावरीत ते तुरतुर निघून गेले.

त्याला परत धसका बसला. तेवढ्यांत प्राध्यापक म्हणाले, " आता हें उदाहरण पहा. Some S is P " तेवढ्यात त्याना कोणीं हाक मारली आणि " थोडा वेळ थाबा हं " असें म्हणून ते आंत गेले. आता त्याला एक ' कोडें ' सोडवायचें होतें. या स्थळीं वर मान करून असें त्यानें प्रथमच पाहिलें. सुदैवानें सगळीकडे शुकशुकाट होता. आत मात्र हसण्याखिदळण्याचे आवाज येत होते.

त्यानें श्वास कोंडला आणि क्षणभर विचार करून ( अथवा ' विचार न करता ' म्हणा पाहिजे तर ) दोन झेपेत आत पाऊल टाकलें—त्या लांबलचक खोलींत मुली अगदीं घरच्यात आल्या-

सारख्या निर्भयपणें वागडत होत्या; अगदीं पलीकडल्या कोपऱ्यांत दहाबारा मुली हंसत खिदळत होत्या. त्या इतक्या पोरकटपणानें वावरू शकतात हा त्याला एक शोधच होता. पिंगपॉग टेबल्सवर एकाद्या क्रिकेट सामन्यांतील तडाखे मारले जात होते. आरशापुढें कांहीं काळ्या मुली गोऱ्या होत होत्या. आणि एकीनें केंस सोडून तें व्यवस्थित बांधायला सुरवात केली होती. मधल्या सतरंजीवर दहाबारा नव्या दिसणाऱ्या अनभिज्ञ मुली कॅरमच्या खेळण्याभोवतीं मोठ्या कौतुकानें जमल्या होत्या ( अगदीं याच नवलाच्या भावनेनं त्यांनीं १०-१२ वर्षांपूर्वी भावलाभावलीचीं लग्न लावलीं असतील. ) कांहीं मुली बाजूच्या दोन कपाटाच्या वस्तुभाडारापाशीं मोटमोठ्यानें बोलत होत्या आणि तिथल्या त्याच्या सभाषणाला दर तीन सेकंदाला एक 'इश्श' या प्रमाणांत ठेका लागला होता. त्याच्यापासून जरा दूर एक अगदीं अभ्यासी मुलींचा घोळका होता; पलीकडे दोनचार मुलीं अगदीं हलक्या स्वरात काही कुजबुजत होत्या. ( अशा तऱ्हेनें कीं आपल्याजवळ दुसऱ्यापासून चोरून ठेवावयाला काहीं तरी आहे, ही मोटी अभिमानाची गोष्ट आहे. ) दोन मुली खुर्च्यांवर वाचत बसल्या होत्या आणि बाकीच्या जत्रेत हिंडत असल्यासारख्या आता इथे, मग तिथें अशा भटकत होत्या.

या सगळ्या दृश्यांत एक गोष्ट अगदीं साधारण होती. आणि ती म्हणजे प्रत्येकीचा हास्यकल्लोळ. त्याचें हसू पाहून एकाद्याला हसू यायचें. आपण जितक्या सहज श्वासोच्छ्वास करतों तितक्याच त्या अजाणता हंसत होत्या. बाकी मुलींना कुठें हंसावें आणि कुठें हंसू नये हें कधींच समजत नाहीं. त्याला तर अशी भ्रांत पडली कीं या मुली बोलत बोलत, हंसताहेत कीं हंसत हंसत बोलत बोलताहेत !

गुऱ्यांतून बाहेर पडणाऱ्या अंमल 'चढलेल्या' माणसासारखा तो बाहेर पडला. पण खरें म्हणजे त्याच्या विकृत कल्पनाचा कैफ 'उतरला' होता.

—पुरुषोत्तम रामचंद्र भिडे.

# सत्कवीचा अधिकार : ११

सत्कवीचा आणखी एक अधिकार सांगण्यासारखा आहे. तो लक्षांत घेतला म्हणजे तो आपल्याहून कसा व किती वरिष्ठ आहे हे चांगलें ध्यानांत भरतें; व सत्कवि ही एक मानव्याची स्वतंत्र प्रत आहे हें पटूं लागतें. एकादा कवि अतिशय दरिद्री होता आणि तो दारिद्र्यांतच मेला; पण त्यानें कवितानिर्मिति मात्र फार सुंदर केली असें कोणाच्या तोंडून ऐकलें म्हणजे कवीचें एक निराळेंच महत्त्व मनाला पटूं लागतें. आपणां बहुतेकांच्या वांट्याला आलेलें दारिद्र्य, अवमान आणि लाचारी यांचें आपल्या चित्तावरचें ओझें आपण निरनिराळ्या तऱ्हांनीं हलकें करतो; इतकेंच काय, पण आपलीं प्रकृतिगत वैगुण्यें व त्यामुळे उत्पन्न होणारी ओशाळगत यांचा विसर पडावा म्हणूनसुद्धां आपण निरनिराळीं साधनें योजतों. सृष्टीनेंच कांहीं साधनें आपल्या मनःप्रकृतींत उत्पन्न करून ठेविलीं आहेत. त्यांचा आपण उपयोग करतोंच व जीं परिस्थितीनें प्राप्त

होतात त्याचाहि उपयोग होतो. पण कवि हा या दोहोंचा उपयोग करून शिवाय आणखी एका मनोव्यापाराचा उपयोग करतो; म्हणून त्याचें मोठें कौतुक वाटतें. एकाद्याच्या अंगीं कुरूपता असली तरी तिचें असावे तितके दुःखद ज्ञान त्याला न होऊं देणें अशी सृष्टीचीच थोडी योजना असते; आणि म्हणून असा कुरूप मनुष्य सुद्धा आरशात बघून थोडं बहुत सुख पावतो. तो काही विशेष प्रकारें केंस राखतो, उटणीं किंवा रंग लावतो, भुवयाच्यामध्ये थोडा शेंदूर लावतो, थोडी कपड्याची झगझग ठेवतो आणि अशा रीतीनें आपले वैगुण्य भरून काढून चारचौघात मिसळण्यास आपण सर्वथा योग्य आहों असा थोडाबहुत अभिमानहि वाहतो. बहुतेक सर्व माणसांना आपल्या सौंदर्याच्या जाणीवेची ही अनुकूल बाधा झालेली असते; आणि हें फार चांगले आहे. यांमुळेंच माणसें सुखी आहेत. जर कां आपल्या शरीरगत वैगुण्याची अगदीं मनाला झोंबणारी जाणीव सर्व माणसांना लागून राहिली तर सर्वत्र रडा-रडच सुरू होईल आणि ज्याच्या त्याच्या तोंडावर खिन्नतेची कळा येईल. पण वर उल्लेखिलेला जो पोकळ अभिमान तो आपणा सर्वांना सांवरून धरण्यास नेहमी तत्पर असतो. अंगाला जर कोठें व्रण झाला तर तो व्रण भरून येण्याला अशी अंगातूनच तयारी असते. आपल्या कुरूपतेची हुरहूर लावणारी जाणीव नष्ट करण्याला त्याच मनांत वागणारा जो पोकळ अभिमान तो फार उपयोगी पडतो व अशा रीतीनें मनाची त्वचा साफ होऊन तें आनंदी राहतें. एकाची भरपाई दुसऱ्या कशाने तरी होते. ज्याला दारिद्र्य आहे तो स्वाभिमानानें वागून दारिद्र्याचें दुःख विसरतो. ज्याला स्वतःच्या वरिष्ठाचें बोलणें खावें लागतें तो आपल्या हाताखालच्याला त्वेषाने बोलून समाधान पावतो आणि कदाचित् वरिष्ठाने मारलेली लाथ घरी आल्यावर कांहीं तरी खुसपट काढून आपल्या अज्ञान बायकोपर्यंत पोंचवितो व अशारीतीने बहेरच्या अपमानाचें शल्य घरात येऊन काढून टाकतो. ही स्वतःच्या वरिष्ठपणाची सूक्ष्म जाणीव म्हणजेच पोकळ अभिमान ही फार हितकारक वस्तु आहे. त्यानें

माणसाला सुख उत्पन्न होते. अस्पृष्टासाठी घातलेल्या आमच्या एका रात्रीच्या शाळेत एक बारकीच पण मोठी मनोरंजक गोष्ट एकदां घडून आली.

सुमारें बारा एक वर्षांचा भाऊ नावाचा मागाचा मुलगा होता. तो रात्रीं आमच्या शाळेत शिकत असे व दिवसा सोजीर लोकांच्या जेवणखान्यात कांहीं काम करीत असे. अर्थात् त्याची व त्याच्या आईबापाची प्राप्ति अत्यंत थोडी होती. अंगावर वस्त्र बेताचें असे; व दारिद्र्यामुळें प्राप्त होणारी अवकळा त्याच्या चेहेऱ्यावर अगदी लिहिल्यासारखी दिसे. आठा दिवसांनीं एकदा सुट्टी मिळावयाची. अर्थात् तो त्या दिवशीं काम नव्हते म्हणून आळींतून हिंडत असताना मी तिकडे गेलो होतों. लांबून पाहिलें तो भाऊ माझ्याकडेच येत होता. एक तोटका पंचा नेसलेला व अगात तोटके कुडतें घातलेला असा हा मुलगा डावा हात मात्र मोठ्या फुशारकीनें हालवीत येत होता. या डाव्या हाताच्या फुशारकीचा अर्थ मला लांबून नीटसा कळेना. तो जवळ आल्यावर मी त्याचें कारण विचारलें व त्याच्या हाताकडे पाहिलें. तो थोडासा ओशाळला. त्यानें हात-घड्याळ नसलेला असा घड्याळाचा रिकामा पट्टा मनगटाला बांधला होता. अर्थात त्यात घड्याळ नव्हतें. पण असले घड्याळ वापरणारीं मुलें जसा आपला डावा हात पुन्हा पुन्हा झोकानें तोंडापुढें आणतात तसा भाऊहि आणीत होता. कोणीतरी सोजरानें वाईट झाला म्हणून टाकून दिलेला हा पट्टा होता. यांत घड्याळ नाहीं हें भाऊला माहीतच होतें. तरीपण त्यानें नुसता पट्टाच घातला व व आपण खरोखरी घड्याळहि घातलें आहे अशा प्रकारचें लटकें सुख तो अनुभवीत होता. अशा त्याच्या त्या सुखानुभवाच्या काळांत मी त्याला गाठलें व त्याला उतारा दिला याचें मला खरोखर वाईट वाटलें. भाऊ अतिशय गरीब होता. त्या गरिबीच्या वेदना कांहीं काळपर्यंत तरी तो या सुखानुभासामुळें विसरून गेलेला होता. अर्थात् त्याचें दुःख त्याला पुन्हा माहीत करून दिलें याचें मला वाईट वाटलें. गरिबीच्या जाणिवेचा विसर भाऊनें ज्या पद्धतीनें

संपादिला होता त्याच पद्धतीचा अगिकार समाजांत शेकडों लोक करीत असतात; पण इतर कोणी अन्य साधनाचाहि उपयोग करतात. कोणी गरीबी हेंच भाडवल बनवितात आणि त्याचें तत्त्वज्ञान बनवून त्यातच सुख मानतात. कोणी कथाकीर्तनांत वेळ घालवितात; कोणी गाजा ओढतात; कोणी आठ दिवसाचा हातात आलेला पगार जुगारात घालवितात आणि जमल्यास कोणी झिंगूनहि पडतात. अशा तऱ्हेनें वर सागितलेल्या सूक्ष्म, पोकळ अभिमानापासून तों तहत मद्यपानापर्यंत हरतऱ्हेचे इलाज करून मनुष्यप्राणी सुखाची संपादणी करीत असतो. आणि या कामात तो जे इलाज योजतो त्यावरून त्याच्या मनाची बळकटी आणि त्याचा मानसिक दर्जा यांचा इतर लोक कयास बाधतात. येथें सत्कवि कसा वागतो तें पाहूं.

सत्कवि दरिद्रीच असतो आणि इतराप्रमाणेंच त्याच्याभोवतीं पोराबाळाचा जजाळ पसरलेला असतो. परतु या सगळ्या हलाखींत मनावरचें गरीबीच्या जाणिवेचें किटण खरडावयास त्याचा एक निराळाच इलाज चालू असतो. इतरांप्रमाणें त्यालाहि दारू पितां आली असती जुगार खेळतां आली असती किंवा गाजा ओढता आला असता. पण यातले काहीं एक न करता, मधाच्या शोधासाठी सर्वत्र भटकणाऱ्या मधमाशीप्रमाणें तो मनानें **सौंदर्याच्या शोधांत फिरत राहतो** हीच त्याची करमणूक. हेंच त्याचें व्यसन. जें सौन्दर्य सामान्य माणसाना कधीहि प्रतीत झालें नाहीं आणि जे ज्या ठिकाणीं असेल असा आदेशाहि सामान्य माणसाला कधीं आला नाहीं तें त्या ठिकाणाहून तो वेंचून आणतो. हजारों तऱ्हेचीं सौंदर्ये आपल्या डोळ्यापुढून चाललेलीं असतात. आपल्याला तीं ओळखूसुद्धा येत नाहीत व ओळखलीं तर त्याचा मोहहि आपल्या मनाला पडत नाहीं. पण कवीचे डोळे दुर्बिणीसारखे असतात. फुलाच्या पोटात अगदीं मध्यावर हरबऱ्याच्या डाळीएवढा एक लहानसा फुगवटा अथवा कणीदार पुंज असतो. आपल्याला तो दिसतो इतकेंच काय तें. पण दुर्बिणीनें पाहाणाराला तो हजारों सौन्दर्य-परमाणूचा झालेला आहे व कदाचित् भावी कालात सुशोभित होणाऱ्या हजारों फुलांच्या

गेंदाचे पूर्वज त्यामध्यें आहेत हें स्पष्ट दिसतें. कवीचें पाहणेंसुद्धां असेंच असतें. मागे डोक्यावर चित्रविचित्र रंगाच्या पेटया घेऊन कांहीं चित्रकथी लोक येत असत. त्या पेटीला बारिक बारिक भिंगें लावलेलीं असत. एक डोळा मिटून दुसऱ्या डोळयानें त्या भिंगातून आत पाहिलें म्हणजे नाना प्रकारचे राजवाडे, उपवनें, राजाराण्या जलविहार हे दिसत असत. पहावयाचें भिंग अगदीं बारीक असे. कवीचें अगदीं असेंच असतें. आपली दृष्टि जेथें जावयाची नाहीं व गेली तर जेथपर्यंत पोंचावयास हवी तेथपर्यंत पोंचावयाची नाहीं तेथपर्यंत कवीची जाते व पोचते; आणि मग नाना प्रकारचीं सौन्दर्यें तेथून तेथून धरून आणून तो आपल्या मनःकटाहात सांठवितो व त्या सर्वांचें मिळून कांहीं मनात मिश्रण झालें म्हणजे सौन्दर्याची भूक लागलेल्या लोकापुढें नानाप्रकारानी मांडतो. हें त्याचें बळ फारच मोठें आहे आणि या बळावर तो आपल्या दारिद्र्याच्या वेदना साफ विसरून जातो. या वेदना नाहीशा करण्याचे वर सांगितलेले इतर लोकाचे इलाज आणि हा कवीनें केलेला इलाज यात खरोखर केवढें अंतर आहे! वर सांगितल्याप्रमाणें या इलाजाच्या थाटावरून कवीच्या मनाचा दर्जा केवढा आहे याचा कयास आपण सर्वांनीं आपल्या मनाशी करावयास हवा.

( आगामी पुस्तकातील एक उतारा )

—प्रो. श्रीपाद महादेव माटे, एम्. ए.